


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# दीपावली

ऑगस्ट
स्मृति
अंक

१९६४ : वर्ष २० वें

मूल्य १ रु.

अनुक्रमणिका







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# दीपावली

साहित्य-कला-संस्कृति
ऑगस्ट : १९६४
वर्ष २० वें
मूल्य १ रु.

## ऑगस्ट - स्मृति - अंक

## श्रेयनामावलि —



दलाल आर्ट स्टुडिओ ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५
Gram : Dalalart

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १ रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.

● Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

# स्मृतींतूनच 'कृती'चा जन्म...

**१५ ऑगस्ट** १९४७ हें आधुनिक भारताच्या इतिहासांतील एक सुवर्णपान! अर्थातच निर्भेळ आनंद हा जगांत क्वचितच प्रत्ययाला येतो. काळ्या ढगाला रुपेरी किनार असते. महापुरुषांच्या जीवनांतही कधीं कधीं सामान्य असे मोहाचे क्षण येऊन जातात. तपस्वी विश्वामित्र विचलित होतो. महात्मेही कधीं कधीं संभ्रमांत पडतात. महापंडितांची बुद्धीही कधीं कधीं विकल होते. पण प्रकृतीचा मूळ धर्म विचारांत घेऊन आपण त्यांना महापंडित, महात्मे, महापुरुष तपस्वी अशी विरुदें वहाल करतों. "विश्वामित्राचा पराभवही धन्य होय" असें एखादा कविवर्य तांबे गाऊन जातो. कारण तपश्चर्या मोठी तसा पराभवही मोठा! १५ ऑगस्टला एक तपश्चर्या संपली. त्या तपश्चर्येंत जयही होता आणि कांहींसा पराभवही होता. जय स्वातंत्र्याचा होता आणि पराभव देशविच्छेदनाचा होता. आम्ही हंसता हंसता रडत होतों आणि रडतां रडतां आम्हांला हंसूंही येत होतें. कारण आम्ही स्वतंत्र झालों आहोंत ही एक नवी जाणीव आम्हांला पुलकित करीत होती. हंसता हंसता घावही वसत होते. हृदय बधीर होत होतं. कानांवर येणाऱ्या वार्तानीं मन ठणकत होतं. पण अखेर त्या साऱ्यांवर मात करणें भागच होते. कारण आम्ही स्वतंत्र झालों होतों ही वस्तुस्थिति फार महत्त्वाची होती, मोठी होती. तिचें मोठेपण अंगी बाणून घेणें भागच होते. तें आमचें कर्तव्यच होतें. स्वतंत्र भारत! स्वायत्त भारत! सार्वभौम भारत! १८१८ सालीं खालीं आलेलें निशाण परत वर चढत होते. हिमालय मुक्त झाला. सह्याद्रि-सातपुडा मुक्त झाले. गंगा मुक्त मनानें वाहूं लागली. यमुनेनें ताजमहालला अभिवादन केलें. झेलम, चिनाव, रावी गोदा–कावेरी या साऱ्यांनीं दिल्ली दरबारला मानवंदना दिली. सिंधुसागरानें गर्जना केली "भारतमाता की जय!" सोमनाथ, महांकाळ, विश्वनाथ मुक्त झाले. दिशा मुक्त झाल्या. एकमेकांचीं स्तोत्रें गाऊं लागल्या. देव मुक्त झाले आणि मानवही मुक्त झाला. गुलाम मानवाच्या मुक्तीचा संगर लढण्यासाठीं भारत मुक्त झाला. १८१८ पासून सुरूं झालेला संगर संपला. वासुदेव बळवंतांपासून ते बटुकेश्वर दत्तांपर्यंत साऱ्यांचें बलिदान वांया गेलें नाहीं. झांशीच्या लक्ष्मीपासून ते कॅप्टन लक्ष्मीपर्यंतच्या स्त्रियांचें हौतात्म्य कारणीं पडलें. सशस्त्र क्रांतिकारकांपासून ते निःशस्त्र सत्याग्रहीपर्यंतच्या हजारों माणसांच्या प्रयत्नांना फळ आलें. ह्या लढ्यांतल्या साऱ्या ज्ञात, अज्ञात शक्तींना अभिवादन! लढाई ही फक्त रणांगणावर लढली जाते ही कल्पना आतां इतिहासजमा झाली आहे. ती सर्व आघाड्यांवर चालूं असते. ती तुरुंगाच्या भिंतीआडही लढते आणि फांशीच्या स्तंभावरही तिचा लढा संपत नाहीं. ती सचिवालयांतही लढत राहते आणि दारुगोळ्याच्या वा एखाद्या यांत्रिक कारखान्यांतही तिचा संगर संपत नाहीं. १९४७ सालीं त्या समराचें एक पर्व समाप्त झालें. त्या पर्वाचे जे मानकरी आहेत ते सारे थोर आहेत. त्यांच्यापैकीं कांहींना इतिहासांत दहावीस पानें मिळालीं तर कांहींना त्यांत अक्षरानेंही प्रवेश मिळाला नाहीं. पण त्या साऱ्यांची कृति मात्र "अक्षर" होती हें निर्विवाद! त्या कृतीची "स्मृति" कायम राखणें आवश्यक आहे. कारण त्यांतूनच "कृती"ची प्रेरणा मिळूं शकणार आहे. १५ ऑगस्ट १९४७ ला लढा संपला ही गोष्ट खरी नाहीं. तो सुरू झाला आहे. त्याची ती तुतारी त्या दिवशीं वाजली. ढोल डिंडिम पिटले गेले. शंख फुंकले गेले. हजारों निर्वासितांच्या किंकाळ्यांची "गीता" रस्त्यांत, गाड्यांत, बैलगाड्यांत वाचली गेली. अजून 'महाभारत" घडायचं आहे. अजून दुर्योधन, दुःशासन, शकुनी यांचा पराभव व्हायचा आहे. आजही द्रौपदीला मांडी दाखविली जाते आहे. अजूनही तिच्या केंसांना हात घालण्याची हिंमत दिसते आहे. अजूनही सतींच्या वस्त्राला हात लावण्याचें धाडस इथें वावरतें आहे. अजूनही




## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे बटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ यथें प्रसिद्ध केलें.

## 'दीपावली'चा "भावे–विजय"

स. न. वि. वि.

'दीपावली'चा मे–६४ चा अंक मिळाला. प्रथम आपलें मन:पूर्वक अभिनंदन कारण श्री. भावे ह्यांनी "उत्तर दिग्विजय" केला पण भाव्यांचा लेख मिळवून आपण खरा 'भावे विजय' मिळविला आहे. लेख वाचल्यावर 'जुने भावे' त्यांत आढळले. श्री. वसंत शांताराम देसाई ह्यांचा 'गोविंद वल्लाळ देवल' हा सुद्धां एक उत्तम लेख आहे. देवलांचा दुर्मिळ फोटो पाहून चित्त प्रसन्न होतें.

आपला

**दि. श्री. कराडकर**

## संग्रहणीय अंक

स. न. वि. वि.

आपण दिलेला 'जुलै'चा अंक वाचला. त्यामधील पं. नेहरूंच्यावर जी मार्मिक आणि सहृदयतेनें लिहिलेलीं आर्टिकल्स आलेलीं आहेत त्यामुळें तो अंक वाचनीय तर झाला आहेच परंतु 'संग्रहणीय' झाला आहे!

श्री. भावे ह्यांनीं दिलेल्या श्री. तांबे यांच्या व्यक्तिचित्रणास जोड नाहीं! प्रत्यक्ष श्री. तांबे ह्यांचीच एक भेट झाली असें कांहीं क्षण वाटले, इतकी ती मुलाखत जीवंत आणि स्निग्ध वाटली! त्यावद्दल श्री. भावे ह्यांना धन्यवाद; आणि श्री. तांबे ह्यांचें अभिनन्दन!

आपला

**के. टी. देशमुख**

"शकुनी" पेंच आम्हांला "द्यूतांत" पकडण्याचे प्रयत्न करीत आहेत. आणि म्हणूनच संगर सरला नाहीं सुरू झाला आहे. गेल्या अठरा वर्षांतली गीता वाचली पाहिजे. तिच्यांतला कर्मवाद समजून घेतला पाहिजे. वज्राची छाती उभी केली पाहिजे. मृत्युंजय मन तयार केलें पाहिजे. विजिगिषु भावना पेटवली गेली पाहिजे. हुतात्म्यांनो, तुमचें अपुरें कार्य आम्ही पुरें करूं ही प्रतिज्ञाही आसमंतात निनादली पाहिजे. ऑगस्टची स्मृति कायम राहिली पाहिजे. राखली गेली पाहिजे.

कारण अखेर 'स्मृतीं'तूनच 'कृती'चा जन्म होत असतो. आणि अशी 'कृती'च नवा इतिहास घडवीत असते. —संपादक




## उत्कृष्ट कथांचा मिलाफ

स. न. वि. वि.

दीपावलीच्या नियमित वाचक वर्गापैकीं मी एक वाचक आहे. दीपावली म्हणजेच उत्कृष्ट कथांचा मिलाफ हें समीकरण आतां अटळ आहे. दर महिन्याला उत्कृष्ट कथा वाचकांना सादर करणाऱ्या श्रेष्ठ मासिकांत आपल्या मासिकाचा नंबर बराच वर लागेल. हें पत्र मुद्दाम लिहिण्याचें कारण असें कीं श्री. फेणे यांची 'एक धर्मकथा' ही कथा मला अत्यंत आवडली आहे. ह्या कथेचा विषय, कथा मांडण्याची पद्धत व भाषाशैली ह्या तिन्ही गोष्टींचा घाट अगदी वेगळा आहे. नेहमीच्या ठराविक चाकोरींतून न जातां एक मनोवेधक कथा लिहिल्यामुळें श्री. फेणे यांचें अभिनन्दन करावेसे वाटते. कथेच्या शेवटी शेवटी तर डोळे अक्षरशः पाणावतात. एक उत्कृष्ट कथा वाचकांना सादर केल्याबद्दल पुनश्च आपले अभिनन्दन.

आपला

**अ. ना. देशमुख**

## हायकू-हायकू —

स. न. वि. वि.

'दीपावली'च्या जुलै अंकांतील प्रा. शांता शेळके यांचा जपानी काव्यप्रकार 'हायकू' संबंधींचा लेख छान आहे.

हिंदीमध्यें अनेक कवींनीं या धर्तीची रचना करून पाहिली आहे आणि त्याचा परिणाम'(!) म्हणजे अलिकडे हास्य-हाइकूंची रचना होऊं लागली आहे.

कदाचित् श्री. चन्द्रकान्त सोनवलकर यांची पुढील हास्य-हायकू (ज्ञानोदय, मार्च १९६४) वाचकांना मनोरंजक वाटेल.

'हायकू' हायकू
प्रगति और' प्रयोग
सारे ये लफडे
कायकू रे कायकू.

आपला

**श्री. वा. जोशी**

## शंका निरसन कराल का?

स. न. वि. वि.

आपला एप्रिलचा अंक वाचला. कै. ह. ना. आपटे यांच्याबद्दलची माहिती देणारे लेख वाचले. त्यांतील प्रा. न. र. फाटक व श्री. आजगांवकर यांनीं लिहिलेले लेख (प्रा. फाटकांनी संपादित केलेले) वाचले. लेख वाचून एक प्रश्न मनांत आला म्हणून आपला अमूल्य वेळ घेत आहे.

कै. आजगांवकरांच्या वाडांत कै. ह. ना आपटे यांचे आडवे गंध नेहमीं असे, असा उल्लेख आपल्या पृष्ठ क्रमांक व ७ वर आहे. आतांपर्यंत कै. आपटे यांचे सर्व फोटो पाहिले. त्या सर्वात उभे गंधच दिसण्यांत आले. आपण प्रसिद्ध केलेल्या दुर्मिळ चित्रांत (पृ. ४७) तर गंधच दिसत नाहीं. ऐतिहासिक स्थलकालांच्या विवाद्य वर्णनाच्या संदर्भात ही विसंगति तर फारच खटकली तरी याबद्दल योग्य ती माहिती द्यावी. शक्य असल्यास कै. हरीभाऊंचा आडवे गंध असलेला फोटो प्रसिद्ध करावा. जेमतेम पन्नास वर्षांपूर्वीच्या माहितींत व प्रत्यक्ष आज प्रकाशित होणाऱ्या साहित्यांत आढळणारा फरक पाहून इतिहासाच्या गुंतागुंतीची चांगलीच कल्पना येते.

आपला

**मो. ह. पिंपळखरे**

मुद्दा बरोबर आहे. चौकशी करूं. माहिती आल्यावर प्रसिद्ध करूं.

—संपादक

**तुमच्या (वि)श्वासावर देशाचा प्राण अवलंबून आहे. तेथें तन, मन, धन वहायचें आहे!**









अनुक्रमणिका

# "क्रांतीचे

**कार्लाइलनें** म्हटले आहे कीं, इतिहास म्हणजे श्रेष्ठ पुरुषांचीं चरित्रें आणि इतिहासांतून त्यांचीं चरित्रें उणी केल्यास केवळ शकावली शिल्लक राहते, असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतिहास म्हणजे भूगोल नव्हे. तोच प्रदेश काल–प्रवासांत अनेक राष्ट्रांचीं रूपें घेत असतो. तेच पर्वत, त्याच नद्या सर्व कांहीं तेंच तें, पण हें दृश्य पाहणारे द्रष्टे अगर साक्षीदार बदलत असतात, आणि बदलणाऱ्यांच्या दृष्टीकोनाबरोबर इतिहासाचें शिल्प जडणघडण घेत असते. संस्कृति ही संस्कारांतून निर्माण होते, आणि संस्कार ही कल्पना मानव सापेक्ष आहे. त्याच्या मनांत जे विचार उत्पन्न होतात, जी प्रतिभा त्याच्या मनामध्यें उचंबळून येते, त्या सर्वांच्या प्रतिक्रिया तो आपल्या भोंवताली परिस्थितीवर उमटवीत असतो, त्याचप्रमाणें परिस्थितीतील बदल मानवी मनावर सूक्ष्म रीतीनें परिणाम करीत असतात. आकाशांत घनदाट ढग आले म्हणजे माणसाच्या मनावर त्याचा परिणाम होतो, वसंत ऋतु आला व सृष्टी नयनरम्य झाली म्हणजे त्याच्या मनाची कळी खुलते, हा अनुभव सर्वज्ञात आहे. सृष्टींमध्यें एक स्वाभाविक क्रम आहे, सृष्टीचा असा एक न्याय आहे, व भौतिक सृष्टीतील कार्यकारणभाव हा नित्य व स्थिर असतो. आणि ह्या नित्यत्वाला अगर स्थैर्याला धक्का देण्याचें काम मानवी मन अगर बुद्धी करीत असते. या कार्याची अभिव्यक्ति भौतिक क्षेत्रांत भौतिक प्रगतीच्या द्वारे होते. मानसिक क्षेत्रांत नवे विचार, नवी ध्येयें, नवीं मूल्यें यामधून ती होते. तोच परिस्थितीचा समूह सर्वांच्यावर सारखे परिणाम करील, हे अनुभवाला येत नाहीं. चंद्रप्रकाशानें चंद्रकांतावर जो परिणाम होतो तो मातीवर अगर दगडावर होत नाहीं. आणि तीच गोष्ट मानवाच्या बाबतींत अनुभवाला येते. त्रस्त परिस्थिति एखाद्याच्या मनांत त्रागा उत्पन्न करते, एखाद्याच्या मनांत संताप उत्पन्न करते, एखाद्याच्या मनांत तें आव्हान स्वीकारण्याची विजिगीषा उत्पन्न करते. दुसऱ्या एखाद्याच्या मनांत दुर्बलता व शरणंगता निर्माण करते. जें आव्हान स्वीकारतात, ते समाजाचें मार्गदर्शक नेते व श्रेष्ठ पुरुष होतात आणि अशांची संख्या स्वाभाविकपणें अल्प असते. पण हे अल्पच राष्ट्राचे शिल्पकार ठरतात. मजूर अनेक असतात, रचणारा गवंडी एक असतो पण त्याहीपेक्षां त्या वास्तूची निर्मिती करण्याचें चित्र ज्यानें प्रथम मन:पटलावर रंगविले तो एकच असतो व तो नेता होतो. चवुतऱ्यापासून मंदीर निमुळते होत जातें आणि देवळाला कळस हा एकच ज्याप्रमाणें असतो. गत इतिहास असें सांगतो कीं, कोठल्याही काल-अवस्थेंत प्रभावी असा एकच नेता असतो. अन्य दुय्यम परप्रकाशित परप्रत्ययनेय बुद्धीचे असतात.

वरील सर्वसामान्य विवेचन लक्षांत घेतां १९४७ पासून ते २७ मे १९६४ पर्यंत या १६–१७ वर्षांच्या काळांत भारताचें नेतृत्व पंडित नेहरूंच्या ठिकाणीं प्रभावीपणें दिसून आलें. त्यांच्या प्रभावळींत अनेक लोक आले आणि गेले पण 'ज्योतिष्मति चंद्र मसैव रात्रौ' ह्या न्यायानें भारतीय राजकारणाच्या नभोमंडळांत ते चंद्रम्याप्रमाणें होते. असा वाद नेहमीं घालण्यांत येतो कीं, "पुरुष श्रेष्ठ कीं परिस्थिति श्रेष्ठ" आणि ह्या वादाला अंत नाहीं, ज्याप्रमाणें फळ आधीं कीं बीज आधीं ह्या वादाचा शेवट नाहीं. अनेक वेळां परिस्थिति गर्जत असून, आव्हान देत असून, आर्त स्वर काढीत असून सुद्धां कोणी वीर कर्तृत्वाची तलवार सरसावून पुढें येत नाहीं. हत्तीचा पाऊस जरी रेगिस्तानांत पडला तरी,





अनुक्रमणिका

# द्रष्टे–जवाहरलाल”

**चंद्रप्रकाशानें ‘चंद्रकान्ता’वर जो परिणाम होतो तो मातीवर अगर दगडावर होत नाहीं. तीच परिस्थिति माणसाच्या बाबतींत अनुभवाला येते. प्रतिकूल परिस्थिति उत्पन्न झाली तर माणसामाणसावर भिन्न प्रति-क्रिया होतील. जे आव्हान स्वीकारतात ते समाजाचें नेतृत्व करतात. मजूर अनेक असतात पण रचणारा गवंडी एकच असतो. त्या वास्तूचें चित्र मनःपटलासमोर उभें करणारा एकच असतो.**

**तो नेता होतो.**
**पंडितजी असे होते—**



न. वि. गाडगीळ

सामान्य तृण सुद्धां वर येत नाहीं. याचे उलट व्यक्ति कितीही प्रभावी असली, कितीही पराक्रमी असली तरी, तिला परिस्थितीचें सहाय्य असावें लागतें. समय अनुकूल असावा लागतो. किंबहुना श्रेष्ठ संगीताची कदर करणारे श्रोते असले तरच मैफल रंगते व संगीताचा आल्हाद उत्पन्न होतो.

पं. नेहरूंना केवळ लौकिक संपत्तीचाच वारसा त्यांच्या वडिलांकडून मिळाला, असे नव्हे. तर राजकीय प्रतिष्ठेचा, कर्तृत्वाचाही वारसा त्यांना मिळाला. आणि उल्लेखनीय गोष्ट म्हणजे त्या वारसा संपत्तीचा उपयोग त्यांनी अतिशय चांगल्या रीतीनें केला. जगामध्यें अनेक आढ्यपुत्र असतात. संपत्ति व लौकिक त्यांना जन्मतःच प्राप्त होतो. तथापि, ते कर्तृत्ववान् निघत नाहींत. किंबहुना त्याच्या उलटच घडते. पंडितजींना घरामध्यें अनुशासनमय वातावरण होतें आणि त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था अशी केली होती कीं, जी योजनापूर्ण होती. आणि एक भव्य व्यक्तिमत्वाचें शिल्प निश्चितपणें उभारण्याचें ठरवून मोतीलालजींनी हें सर्व केले होते. आज पंडितजींच्या व्यक्तित्वाचा अनुभव जो दिसून आला आहे, त्याचें मोठ्या अंशानें श्रेय त्यांच्या वडिलांकडे जातें. असें सांगतात कीं, कॉंग्रेसचे पहिले सरचिट्णीस अयोध्यानाथ कुंझरू हे होते. ज्यांचे चिरंजीव हृदयनाथ कुंझरू यांना लहानपणी पाहिल्यावर त्यांची ओळख अयोध्यानाथ यांचे चिरंजीव अशी उमेश बॅनर्जींना करून देण्यांत आली त्यावेळीं ते म्हणाले कीं, पुढें भविष्यांत अयोध्यानाथ यांची ओळख हृदयनाथ कुंझरूंचे वडील अशी करून देण्यांत येईल. तसेंच आज जवाहरलाल व मोतीलाल यांचे बाबतींत म्हणतां येण्यासारखे आहे. जवाहरलाल यांचें इंग्लंडमधील शिक्षण पुरें झाल्यानंतर ते भारतांत परत आले, आणि कांहीं काळ बॅरिस्टरी केल्यानंतर देशाच्या राजकारणांत त्यांनी भाग घेण्यास सुरुवात केली. उत्तर प्रदेशांतील एका राजकीय परिषदेंत वडिलांच्याच कांहीं विधानांना त्यांनीं विरोध केला आणि लोकप्रियतेच्या दालनांत प्रवेश केला. तेव्हांपासून ते मृत्यूपर्यंत व त्यानंतरही लोकप्रियतेच्या गळ्यांतील मंगळसूत्राप्रमाणें ते भूषविले जात आहेत. ५० वर्षांच्या राजकीय जीवनांत त्यांची लोकप्रियता सारखी वाढतच गेली आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांना कुठेंही व कधींही विरोध झाला नाहीं. तथापि त्या विरोधानें त्यांची लोकप्रियता उज्ज्वलच झाली. लोकप्रियता अगर कीर्ति ही यशांतून निर्माण होते व तिच्यांतून यश निर्माण होतें.

जवाहरलाल नेहरू यांच्या जीवनकार्याचा विचार करतांना “चळवळे नेहरू” व “शासनाधिष्ट नेहरू” अशा दोन व्यक्तींचा विचार करावा लागतो. भारताचें राजकारण १९२० पर्यंत ज्या सिद्धांताला अनुसरून चाललें होतें, त्याला अनुसरूनच जवाहरलाल यांचे जीवन दिसून आलें. वर्षातून दहा-पांच ठिकाणीं सभा, क्वचित लेख व साल अखेर कॉंग्रेसचें अधिवेशन, भाषणाचे विषय ब्रिटिश अमदानींतील जुलूम व त्यांना लोकमतांच्या वेशीवर बांधणें एवढेच होते. आणि लोकशिक्षणाचें कार्य मुख्य शहरें–विशेषतः मुंबई व कलकत्ता व त्यानंतर प्रांताच्या राजधान्या यापलिकडे फारसें नव्हतें. राजकीय नेतृत्व हें प्राधान्येंकरून वकील वर्गाकडे होते. व लक्ष्मीधराप्रमाणें संध्याकाळच्या वेळीं घडी अर्धा घडी तें करावयाचें एवढीच त्याची मर्यादा होती. कुठली तरी प्रक्षोभकारी घटना झाली म्हणजे वातावरण तापे, कंपवात सुटावा त्याप्रमाणें लोकजीवन थरथरें आणि नंतर थंड होई. विसाव्या शतकाच्या सुरुवातीस अर्ज-विनंत्या, शिष्टमंडळें ब्रिटिश लोकांच्या तथाकथित न्यायभक्ति व स्वातंत्र्य प्रेम ही सारी व्यर्थ ठरली आहेत, ह्याचा साक्षात्कार झाला. या सार्वजनिक जीवनाचे आद्य पुरोहित न्यायमूर्ति रानडे हे १९०० सालीं दिवंगत झाले. त्यांच्या मरणापूर्वीं पांच-दहा वर्षातच नवी पिढी, नवी लाट, नव्या आकांक्षा वर येऊं लागल्या होत्या. आणि केवळ दोन हात व एक मस्तक ह्या त्रिशुळानें दैत्य संहार होणार नाहीं, ह्याची जाणीव होऊं लागली होती आणि महत्वाकांक्षी कर्तृत्व व अधीर झालेली स्वातंत्र्याची तळमळ मुठी वळूं लागली होती. कांहींनी आपल्या वक्तृत्वाच्या मुठींतून प्रतिभेची शक्ति, प्रेरणेची शक्ति व धाक दाखविण्यास सुरुवात केली होती. तर कांहींनी अत्याचाराकडे वळणें इष्ट

आहे, असाही संकेत अभिव्यक्त केला होता. भारतांतील प्राचीन व परंपरागत अनुभव राजा भरतांच राज्यक्रांति म्हणजेच व्यक्तिगत राजकारणाची परंपरा होती. ज्याच्याशीं सामना द्यावयाचा ती आतां व्यक्ति नव्हती, एखादें खानदान नव्हतें, आतां ते प्रचंड यंत्र होतें व एक भाग तुटला तर ताबडतोब दुसरा बसविण्याची सोय होती. म्हणून व्यक्तिगत अत्याचारानें जुलमाचा बदला शक्य नव्हता, निदान प्रभावी नव्हता हें लोकमान्यांसारख्या दीर्घ दृष्टीच्या लोकांनीं ओळखलें. भारताचें भवितव्य लोकशाही स्वातंत्र्याचें-आहे, व ते मिळविण्याचें शस्त्र एकमेव जरी नसलें तरी अत्यंत प्रभावी, परिणामकारक म्हणून लोकशिक्षण, लोकजागृति व शांततामय उठाव हेंच होय, याची जाणीव झाली. ज्यांचा उपयोग होत नाहीं, ती शस्त्रें टाकलीं जातात, नव्या शस्त्रांचा प्रयोग करण्यांत येतो. प्रयोग व अनुभव व अनुभवाला द्यावी लागणारी चुकांची किंमत या मार्गानें राष्ट्राची प्रगति होत असते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला नव्या मंडळींनी जुन्या कार्यप्रणालीपासून किंचित् निराळें असें कार्य सुरू केलें. मोठ्या शहरांतून आतां लहान लहान शहरांकडे त्यांनी आपले मोर्चे वळविले आणि १९५० सालीं जेव्हां वंगभंग झाला, त्यामुळें वंगालची फाळणी झाली पण देश एकसंध, झाला. प्रक्षोभाची, संतापाची लहर उठली आणि या खळवळींतून नवा राजकीय पंथ निघाला व कलकत्ता कॉंग्रेसच्या १९०५ च्या अधिवेशनाचे वेळीं लाल, बाल, पाल यांनीं चतु:सूत्रीचा डमरू वाजवून भारताच्या राजकारणांत नवा अक्षरपट निर्माण केला.

लोकमान्य टिळक १९०८ सालीं शिक्षा होऊन मंडालेला गेले. त्यानंतर अधिक वृद्धिगत होत गेलेला आतंकवाद व त्याविरुद्ध सरकारनें केलेली बेफाम दडपशाही यांतून राष्ट्रामध्यें हतप्रभतेचा, निराशेचा सूर निघूं लागला. त्याचबरोबर सूडबुद्धि राजकारणांत शिरूं लागली. बाह्यतः १९१४ सालीं महायुद्ध सुरूं होईपर्यंत भारताचे राजकारण ठप्प झालें होतें. त्यानंतर महायुद्ध सुरूं झाले. आणि लोकमान्यांनी सुटून आल्याबरोबर राजकारणाला एक कलाटणी दिली. त्या राजकारणाचा परिणाम पं. नेहरूंच्या मनावर विशेष झाला. "क्रियावान् स पंडित:" याचें रहस्य त्यांनी ओळखले. क्रांतिकारकांचे तत्त्वज्ञान त्यांनीं अभ्यासिले होते. आणि लोकांचा प्रचंड उठाव, लोकशिक्षणद्वारा त्यांना संघटित केल्याशिवाय, होत नाहीं हें त्यांनी ओळखले. व्यापक लोकशिक्षण हें स्थानिक राजकारणांत गुंतून राहिल्यास होऊं शकत नाहीं व गुंतागुंतीची व संकुचित हितसंबंधात बुद्धि खर्ची पडते व प्रसंगीं चारित्र्यही हिणकस होतें. या दृष्टीनें विचार करतां जवाहरलालजींनी असल्या भानगडींत न पडतां लोकशिक्षणाचें कार्य सुरूं केलें. २० व्या शतकाच्या सुरुवातीला निर्माण झालेले नवें नेतृत्व त्याची लहर १९२० च्या व त्याच्या आधींच्या घडलेल्या घटनेपर्यंत येतांच ओसरली. जालियनवाला बागेच्या हत्याकांडाच्या घटनेनें भारताच्या राजकारणाला निराळी कलाटणी दिली.

गांधीजी १९१५ च्या फेब्रुवारी महिन्यांत कायमच्या वस्तीसाठीं भारतांत परत आले. सारी लौकिक संपत्ति द. आफ्रिकेंत सोडून राजकीय क्षेत्रांतील अनुभव, धन व रत्नें मात्र त्यांनीं भारतांत आणली. अंतरीं विचार केला, बोलले लघु आणि कुशल कारागीर ज्याप्रमाणें नकाशा आंखून मंझिल बांधतो, त्याप्रमाणें गांधीजींनी आपला कार्यक्रम नियोजिला. माणसें पारखली, जवळ केली आणि रामदासांनीं म्हटल्याप्रमाणें "ठायीं ठायीं मंडळचा स्थापल्या" उ. प्रदेशांत त्यांच्या विश्वासाला पात्र झालेली २ माणसें म्हणजे नेहरू पिता-पुत्र होय. थोरले नेहरू यांनीं अक्षरश: संपत्तींतून आपत्तींत प्रवेश केला. त्यांच्या साऱ्या जीवनांत परिवर्तन झालें. अमिरीं सोडून फकिरी घेतली. आयुष्यभर मनाने जवळ बाळगलेलीं वर्तनमूल्यें बाजूला सारून निराळ्या चारित्र्याचा मार्ग स्वीकारला. प्रतिष्ठेचा पाया संपत्ती व समृद्ध जीवन नसून त्याग व जनसेवा आहे, ह्याचा साक्षात्कार त्यांना झाला. तीच भावना अधिक प्रमाणांत जवाहरलालजींच्या मनांत उत्पन्न झाली. गांधींनी हतप्रभ झालेलें राजकारण उत्साही केलें. कायद्याच्या मर्यादेंत राहून आंदोलन करणें, ही भूमिका सोडून कायद्याची वैधता व प्रतिष्ठा ही ज्यांच्या जीवनावर संबंधित कायद्याचा प्रभाव पडणार असेल त्यांच्या संमतीवर अवलंबून आहे. कायदा अधिकारी व्यक्तीनें केला, ही त्याची कसोटी नव्हे, तो योग्य आहे की नाहीं, ही त्याची कसोटी आहे. व त्याचें पालन करणें हें तो कायदा लोक संमतीवर आधारलेला असेल, तरच



अनुक्रमणिका







अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कर्तव्य ठरते, अन्यथा तो मोडणें म्हणजे सत्याग्रह करणें, हा व्यक्तीचा धर्म ठरतो. ह्या क्रांतिकारक तत्त्वज्ञानाने विद्यमान् सरकारची प्रतिष्ठा समाप्त झाली, आणि साऱ्या समाजाचें स्थैर्य शासनाची आज्ञा मानणें यावर अवलंबून असते तोच पाया गांधींनी उखडून टाकला. हिंसात्मक क्रांतीला एक नवा व प्रभावी विकल्प गांधींनीं भारतापुढें नव्हे, जगापुढें मांडला. या सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानानें लोकांच्या मध्यें नवीन आत्मविश्वास उत्पन्न झाला, आणि यशाचें गमक चारित्र्य श्रेष्ठत्वांत गणलें जाऊं लागलें. व त्यामुळें तात्कालीन पराजय हा परास्त वृत्तींत कधीही परिवर्तित झाला नाहीं. १९२१ साल हें स्वराज्य वर्ष मानलें गेलें. ५० हजारांवर लोक सत्याग्रह करून कारागृहांत गेले. माणसाच्या श्रेष्ठत्वाचें माप त्यानें केलेला त्याग व सेवा हें झालें. क्षणभर कां होईना ब्रिटीश सरकार "गडबडले व गोंधळले" हेंच एक यशाचें मोठें गमक मानलें जाऊं लागलें. भारताच्या राजकारणांत सत्याग्रह हें एक प्रचंड व जवळ जवळ यश मिळविण्याच्या दृष्टीनें एकमेव साधन बनलें, प्रभावी शस्त्र ठरलें.आणि या सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा स्वीकार अनेकांनीं श्रद्धेनें, अनेकांनीं अनुशासनासाठीं, अनेकांनीं स्वैर वृत्तीनें केला. जवाहरलालजींची वृत्ति महिल्या व दुसऱ्या वृत्तींच्या मधली होती. गांधींवर नितांत श्रद्धा होती. अनुशासनावर त्यांचा भर होता. किंबहुना अनुशासनाला त्यांच्या जीवनांत मोठी भूमिका होती.

गांधीजी हे कोणी नवविचार समोर आणला तर, त्याचा ते अनादर करत नसत, आणि जर तो त्यांच्या मौलिक श्रद्धेला विसंगत नसेल तर, ते स्वीकारत. जवाहरलाल हे नवविचार करत आणि इतिहासाचे संदर्भात नित्य मानलेली मूल्यें सुद्धां तपासत. निराळ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे त्यांची दृष्टि शास्त्रीय होती. मनाच्या प्रयोगशाळेंत निर्माण होणाऱ्या घटनांची ते शास्त्रीयदृष्ट्या पृथःकरण करत, मागील घटनांशीं अन्वय लावण्याचा प्रयत्न करत. व पुढील विचारप्रवाहांचा अर्थ काय होईल याचा सुगावा घेत. आणि त्यामुळें एकाएकी कांहीं घडलें, असें झालें असतां ते गडबडत नसत, कारण त्यांच्या वैचारिक अंदाजपत्रकांत कुठेंतरी लौकिकदृष्ट्या अचानक घडलेल्या घटनेला कसें तोंड द्यावे, याची थोडीबहुत व्यवस्था असे. परंपरागत भारतीय समाज बदलावयाचा आहे, म्हणून सतत विचार करण्याची संवय भारताच्या नेतृत्वांत अवश्य असली पाहिजे. या मताचे ते होते. साऱ्या धर्माचें प्रगटन कुराणांत अगर बायबलमध्यें झालें, असें मानणारी त्यांची श्रद्धा नव्हती. त्यांचा वैचारिक धर्म "किताबी" नव्हता. निरिक्षण, परीक्षण, विचक्षण या गोष्टींवर अवलंबून होता, व सतत वाचनानें मनांतील ज्ञान भांडार ते वाढवत असत. विचारानें व चिंतनानें त्याची व्यवस्था ते चांगल्या प्रकारें ठेवत. कारभाराची जबाबदारी व बोजा आल्यानंतर नवविचारांना त्यांना फारसा वेळ मिळाला नाहीं हें खरें. तथापि, नित्य नवे नवे ग्रंथ ते सूक्ष्मपणें अभ्यासीत नसलें तरी चाळत असत, व आधींच असलेली ज्ञानाची मोठी बैठक नवे विचार समजून घेण्यासाठीं त्यांना फार वेळ लागूं न देण्यास कारणीभूत होई. त्यांच्या विद्यमान् जगांतील आधुनिक विचार-प्रवाहाशीं ओळख असल्यामुळें भारतीय राजकारणाला व भारतीय राजकीय विचारांना जागतिक संदर्भात त्यांनी दाखल केलें. १९२७ मध्यें कॉंग्रेसच्या मद्रासच्या अधिवेशनांत त्यांनीं स्वातंत्र्याचा ठराव मांडताना जें भाषण केलें, त्यांत ते म्हणाले कीं, "भारताचा स्वातंत्र्याचा लढा ही संदर्भशून्य, एकाकी अशी घटना नव्हे. जगामध्यें गुलामींत असलेल्या परदास्यांत असलेल्या लोकांच्या स्वातंत्र्याचा जो लढा सुरू झाला आहे त्याचाच एक भाग आहे, पददलित, वंचित, उपेक्षित अशीं दुःखी व दरिद्री जनतेनें आर्थिक गुलामगिरी विरुद्ध, सामाजिक विषमतेविरुद्ध जो लढा चालवलेला आहे, त्याचाहि हा एक भाग आहे." या त्यांच्या दृष्टीकोनामुळें भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्याला एक नवी प्रतिष्ठा मिळाली व जगांतील स्वातंत्र्यप्रेमी, समतावादी लोकांची व राष्ट्रांची सहानुभूति मिळाली. आपण केवळ एकाकी, अभिमन्यूप्रमाणें लढत नसून गांवचा लढा आपण चालवत आहोंत. आज ना उद्यां गांवांतील लोक यांत सामील होतील, ही श्रद्धा त्या व्यक्तीला वज्राचें बळ देते. त्याचें सामर्थ्य व हिंमत द्विगुणित होते. तीच गोष्ट पुढें भारताचे अनुभवाला आली. ब्रिटनमधील मजूर पक्ष कांहीं प्रमाणांत व अमेरिकन राष्ट्रही या स्वातंत्र्याच्या लढ्यांत लक्ष घालूं लागली.

एकदां भारताच्या स्वातंत्र्याचा लढा जागतिक स्वातंत्र्याच्या लढ्याचा भाग झाला म्हणजे एक नवी जबाबदारी भारतावर येणार याची जाणीव पंडित नेहरूंना होती. आणि त्याच जाणिवेनें एक विशिष्ट दृष्टिकोन ठेवून परराष्ट्रीय धोरणाबाबत अगर परराष्ट्रीय राजकारणाबाबत ते बोलत व लिहित असत. हिटलरचा उदय झाल्यापासून त्यांनीं कॉंग्रेसच्या अधिवेशनांत हिटलरशाही विरुद्ध भाषणें करून लोकशाही स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याचा आदेश सर्व स्वातंत्र्येच्छु जनांना दिला. इंग्लंडनें हिटलरला जोपासले, आणि त्याचें प्रायश्चित्त सर्व जगाला मिळालें. स्वातंत्र्य व समता यांच्या तळमळीनें पंडितजींचें अंतःकरण सतत खळबळपूर्ण असे. आणि क्रांतीचा विचार शास्त्रीय पद्धतीनें ते व्यक्त करीत असल्यानें त्यांनीं आपला जो क्रम ठरवला तो सुसंगत होता. क्रांति व तडजोड हें विसंगत, तथापि अहिंसेचें तत्त्वज्ञान त्यांनीं स्वीकारल्यानें ते द्वेषरहित होते. आणि म्हणूनच

(पान ५२ वर पहा)



*स्वादिष्ट, उत्तम चहाची*
*तलफ भागविण्यासाठीं*

# टाटा-फिन्ले
## चहा
*अप्रतिम चहा आहे!*

टाटा-फिन्ले चहा आपल्याला नेहमीं ताजा, स्वादिष्ट सुवासयुक्त, आणि हवा तसाच कडक मिळतो. याला कारणेंहि तशींच आहेत.

### ताजा चहा
टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें तो नेहमींच ताजा असतो.

### स्वादिष्ट चहा
टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें, आपल्याला नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

### उत्तम चहा
टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिन्ले** *चहा प्या;*
*चहाचा खरा आस्वाद घ्या!*









**महाराष्ट्राचे सिद्धहस्त साहित्यिक**

## श्री. पु. भा. भावे

*यांना प्रत्यक्ष युद्धभूमीचें दर्शन घेण्याचा योग गेल्या ऑक्टोबरांत आला. त्यांच्या-सारख्या देशप्रेमी लेखकाला आलेल्या, उत्सुकता वाढविणाऱ्या या प्रतिक्रिया....*

**एका** प्रात:काळीं आम्ही सफदरजंग विमानतळावर उपस्थित झालों. विमानानें आम्हांस पोटांत घेतलें ह्याचाच मला आनंद झाला. पण देशपांड्यांना कांहीं हें विमान पाहून संतोष झाला नाहीं.

"हॅट् ! हें डाकोटा आहे!" ते म्हणाले.

"डाकोटा असलें म्हणून काय झालें?" मी बालबुद्धीनें प्रश्न केला.

"अहो, डाकोटा म्हणजे विमानांतला खटारा ! मुंबईहून येतांना आपल्याला व्हायकौण्ट मिळालें होतें!"

विमान म्हणजे विमान येवढेंच मला ठाऊक होतें. त्यांतलें 'डाकोटा' आणि 'व्हायकौण्ट' हे बारीक भेद मी ओळखत नव्हतों. जसे 'पांचशें पंचावन्न' आणि 'पीला हत्ती' ह्यांतला भेद नव्यानें धूम्रपान करणारा ओळखत नाहीं ! त्याला वाटतें धूर म्हणजे धूर ! मग तो 'स्टेट एक्स्प्रेसचा' काय किंवा 'चार मिनार'चा काय! परंतु ह्या आकाशयानांत प्रवेश करतांच 'डाकोटा'चा एकूण लहानपणा माझ्या ध्यानीं आला. विमानाचे पंख चुकवून खिडकी धरण्याइतपत शहाणपणा एव्हापर्यंत मी शिकलों होतों. एरवीं नुसते पंखच दिसतात. खालचे कांहीं दिसतच नाहीं. आणि मला तर दिसेल तेवढें पहायचें होतें.

विमानानें उड्डाण केलें आणि माझा चेहरा कांचेशीं लागला. आमच्याच विमानांत प्रसिद्ध गायिका अख्तरीबाई फैजाबाई ह्याहि होत्या. त्यांच्याशीं आमचा औपचारिक परिचयहि देशपांड्यांनीं करून दिला. होता. मला ह्या बाईचें गाणें फार आवडतें. पण तूर्तास बोलण्यापेक्षांहि खालीं पहाणें मला अधिक महत्त्वाचें वाटत होतें. गांवामागून गांवें जात होतीं. प्रश्न विचारण्याइतकें धारिष्ट आतां माझ्या ठायीं शिल्लक नव्हतें. माणसें स्वेच्छेनें बोलतील तेवढें मी ऐकत होतों.

"ती यमुना", "तें जम्मू", "हें बनिहाल' वगैरे जाणत्याचे शब्द मधूनच कानावर पडत होते. 'बनिहाल'चें नांव ऐकतांच मी खूप अस्वस्थ झालों. हें नांव मी अनेकदां ऐकलें, वाचलें होतें. पण ह्या उंचीवरून बनिहालचें रूप अजिबात डोळ्यांत भरत नव्हतें. एक मनुष्य म्हणून विमानानें प्रवास करणें ठीक होतें. पण कुठलीहि जागा खरोखर पहायची तर ती पायींच पाहिली पाहिजे, हें माझें मत बळकट होत होतें. विमानप्रवासाच्या पहिल्या धक्क्यांतून एव्हांना मी सावरलों होतों व त्या प्रवासाच्या मर्यादा माझ्या ध्यानांत येत होत्या. वेळ वांचविण्याची गोष्ट सोडा, पण 'पहाण्याच्या' दृष्टीनें म्हणाल तर आगगाडीसारखें भुईवरून धांवणारें कुठलेंहि वाहन विमानापेक्षां उजवें होतें. आणि पायांची सर तर कुणालाच नव्हती. गौरीशंकरावर जाणाऱ्या माणसांना विमानें उपलब्ध नव्हतीं म्हणून कांहीं त्यांनीं आपले प्रवास पायीं केले नाहींत.

"हें बनिहाल" ह्या शब्दासरशीं डोळे ताणून मी खालीं पाहिलें. पण बनिहालचीं जीं शब्दचित्रें मीं वाचलीं होतीं त्यांच्याशीं मी जें पहात होतों, तें मुळींच जुळेना. राजाबाई मनोऱ्याच्या माथ्यावरून खालीं ठेवलेलें एखादें सुंदर पुस्तक पाहाण्यासारखाच तो प्रकार होता. हिरव्या रंगाचें उंचावरून पाहिलेलें सारवण म्हणजे कांहीं वनश्रीचें दर्शन नव्हे. बर्फानें आच्छादिलेलीं खडीसाखरेच्या तकाकत्या खड्यासारखीं पर्वतशिखरें मी शेकडों पहात होतों. तो देखावा भव्य होता, सुंदर होता. 'ह्या पीरपंजाल पर्वतश्रेणी' पुन्हा कुणीतरी म्हणत होतें व त्या दिशेनें मी टकमकां पहात होतों. पण माझी आंतरिक इच्छा त्या पर्वतश्रेणींना जवळून निरखण्याची होती. त्यांच्या डोक्यावर नव्हे तरी निदान त्यांच्या पायाशीं आपल्या पायानें जाण्याची होती. विमानांत बसून अर्थातच हें शक्य नव्हतें. म्हणून जेवढें दिसेल तेवढें मी पहात होतों. शेंकडों कोशार्ध भूमि मागें पडत होती. अनेक गांवें, अनेक मनुष्यसंघ, अनेक पर्वत व नद्या पहातां पाहातां आम्ही पार करीत होतों. श्रीनगर हें आमचें लक्ष्य होतें. प्रथम श्रीनगर व नंतर लेह. प्रवासाचा हा दुसरा टप्पा होता. आणि पट्टे बांधण्याची सूचना समोर उजळली. विमान खालीं उतरूं लागलें. चित्ररूपानें आधींच परिचित झालेलें





अनुक्रमणिका

# गीर्वाण भाषेच्या माहेरघरांत

काश्मिरचें दृश्य उलगडूं लागलें आणि मी समजलों कीं आतां श्रीनगर आलें. सुंदर नांवाचें तें श्रीनगर खरोखरच आलें होतें. ठरलेले फेरे घेऊन श्रीनगरच्या तळावर आमचें विमान स्थिर झालें होतें.

विमान थांबलें व कडक गणवेषांतल्या सैनिकी अधिकाऱ्यांच्या आम्ही स्वाधीन झालों. ह्या क्षणापासून आमचें संपूर्ण "सैनिकीकरण" झालें. आतां आम्ही पाहुणे सैन्याचे होतों. आमचे पालक व मार्गदर्शक सेनाधिकारी होते. स्वागतासाठीं आलेल्या सेनाधिकाऱ्यांशीं हस्तांदोलन करून आम्ही सरळ आमच्यासाठीं आणलेल्या वाहनांकडे निघालों. "अरे हमाल, तें सामान उचल पाहूं आधीं" म्हणून कंठशोष करण्याचें कारणच नव्हतें. सामान आपसूक गोळा झालें व एका वेगळ्या गाडींत जाऊन पडलें.

काश्मिरच्या भूमिला पाय लागतांच मी सभोंवार पाहून घेतलें. भोंवतालचें दृश्य वैराण होतें. दूर डोंगर दिसत होते खरे. पण जवळ सारी ओसाडी होती. विपुलकीर्ति काश्मिरांत इतका रुक्ष भूभाग पाहून साऱ्यांचेच चेहेरे वांकडे झाले. ह्या प्रकारचा अपेक्षाभंग मला नवा नव्हता. घाणेरड्या वस्तींतला ठोकळेवजा ताजमहाल पाहून माझा असाच विरस झाला होता. काश्मिरविषयीं कडू तोंड करून बोलणारीं माणसें मला भेटलेलीं होतीं.

"अहो, कशाचें काश्मीर!" एक परिचित मला म्हणाला होता, "तिथें चांगलें उकडतें आणि घामसुद्धां येतो." काश्मिरांत घाम यावा आणि उकडावें ह्याचाच त्याला संताप आला होता. दुसऱ्या एकानें त्रासिक चेहरा करून मला सांगितलें होतें, "कांहीं काश्मीर येवढें सुंदर नाहीं. आमच्या मुंबऱ्याच्या खाडीजवळचा देखावासुद्धां तितकाच सुंदर आहे. शेंकडों रुपये वेंचून आणि शेंकडों मैल तुडवून तिथें जाऊन धडपडण्याचें मुळींच कांहीं कारण नाहीं."

काश्मिरविषयक हीं विधानें माझ्या ध्यानांत होतीं. त्या विधानांचा प्रत्यय विमानतळापुरता तरी मला आलेला होता. पण आम्ही विमानतळ सोडला आणि जादू झाल्याप्रमाणें सारें दृश्य पालटूं लागलें. निसर्ग आपल्या ठेवणींतील एकेक रंगीबेरंगी घडी आमच्यासमोर फेकूं लागला. मुंबईचा मुंब्रा-घोडबंदरसारखा परिसर सुंदर आहे, ह्यांत कांहीं संशय नाहीं. मुंबईचा निसर्ग आज माणसांनीं बुडवून टाकला असला तरी मुंबई मूळची सुंदर आहे. पण काश्मिरचें सौंदर्य कांहीं वेगळें होतें. इथले डोंगर वेगळे, भूमि वेगळी, झाडपाला वेगळा. कोमलता व भव्यता ह्यांचें कांहीं विलक्षण मिश्रण येथें झालेलें आढळतें. चिनारचा वृक्ष भव्य आहे व सफेता कोमल आहे. ह्या वृक्षांच्या झुंडी मला दिसत होत्या. चिनारचें सौंदर्य डोळ्यांत भरावयास वेळ लागतो. पण फांद्यांचे हात आकाशाच्या दिशेनें एखाद्या नयनरम्य नर्तकीप्रमाणें वळवून उभ्या असलेल्या चिनारच्या ओळींवरून माझी दृष्टि चळेना. ह्या वृक्षांच्या छायेंत मला एखादी महाश्वेता दिसेल, एखादी महानंदा दिसेल, एखादा चारुदत्त किंवा अभिनवगुप्त दिसेल असें मला उगाचच वाटत होतें. काश्मीर हें शारदा लिपीचें व गीर्वाणभाषेचें माहेरघर: उच्च स्वरांतील वेदघोष येथें माझ्या कानावर पडेल अशी अपेक्षा माझें मन करीत होतें. पण माझ्या कानावर पडली वाटेवरची कलकल. आणि माझ्या डोळ्यांना दिसले मळक्या वेषांतील असंख्य मोहम्मद हुसेन! मळक्या चिरगुटांची घाण दुरूनच जाणवावी, तशी त्यांच्या पायघोळ वस्त्रांची घाण मला दुरूनच जाणवत होती. काश्मिरांतला निसर्ग नितळ होता आणि माणसें मळकट होतीं. तीं क्षेत्रस्थ पंड्याप्रमाणें लोचट, हावरट आणि खोटें बोलणारीं होतीं, हें 'टुरिस्ट रिसेप्शन सेंटर'मधील रहिवासांत आमच्या ध्यानांत आलें.

'टुरिस्ट रिसेप्शन सेंटर'मध्येंच आमची रहाण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. ह्या केंद्राच्या दिशेनें आमची जीप धांवत असतां मी दिसेल तेवढा निसर्ग पाहिला. माणसेंहि पाहिलीं. पण माझ्या मनावर विलक्षण आघात केला तो आभाळांत उंचच उंच चढलेल्या श्रीशंकराचार्यांच्या टेकडीनें, त्या टेकडीवर भूतभविष्याला आव्हान देत उभ्या असलेल्या शंकर मंदिरानें, त्या मंदिरावर अखंडपणें तेवत असलेल्या दिव्यानें. सहस्र फूट उंचीची ही टेकडी होती. सारें श्रीनगर या टेकडीच्या पायाशीं लीनपणें प्रणिपात करीत होतें. आणि टेकडीवर होता भोळाभावडा, विरागी, करुणामय पण प्रलयंकर श्रीशंकर. तपश्चर्येचें ठाण मांडून तो तेथें बसला होता. अद्याप तो दक्षहंता, दीनदयाघन कशाची वरें वाट पहात होता? अद्याप त्याचे डोळे मिटलेले कां होते? सभोंवार अंधकार दाटत होता. हिमालयावर पीतदैत्यांच्या छाया पडल्या होत्या. वरदानानें उन्मत्त झालेले भस्मासुर आतंक माजवीत होते. कल्मलानें व काजळीनें दिशा जड झाल्या होत्या. तर मग अद्याप डमरू कडाडत कां नव्हतें? धरणी कांपत कां नव्हती? ज्वाला उफाळत कां नव्हत्या? अद्याप पाप भस्मीभूत कां होत नव्हतें, पुण्य यशाप्रत कां जात नव्हतें?

पुन्हां पुन्हां मी आकाशाचा भेद घेणाऱ्या त्या मंदिर-शिखराकडे वळणें घेणाऱ्या वाहनांतून पहात होतों. आणि अकस्मात् समोर प्रकट होणाऱ्या वरदेवतेप्रमाणें तें मंदिर पुन्हां पुन्हां माझ्या डोळ्यासमोर उभें होत होतें. अंतराळांतल्या त्या देवळाकडे पाहतांच माझें मन शंकेनें तसेंच श्रद्धेनें, निराशेनें तसेंच आशेनें कांपत होतें. मंदिरपर्वताच्या अल्याडच आमचीं वाहनें थांबलीं. पलिकडे समोरच तो शंकरपर्वत होता. "आमचें प्रवासी विश्राम केंद्र" त्याच्या राज्यांतच होतें. केंद्राभोंवती मोठें आवार होतें. आवारांत परोपरीचीं फुलझाडें होतीं. वाटेच्या कडेनें चिनार ठाण मांडून खडे होते. आणि प्रवेशद्वाराशीं होते शिकारेवाले, खाणावळ

वाले, टांगेवाले, चांभार व भिकारी. गुळाचा खडा पाहतांच माशांनीं घोंगावत यावें तसें ते आमच्या अंगावर धावून आले. आम्ही संरक्षण सेनाधिकाऱ्यांची ढाल केली, व अतिथिगृहाच्या कार्यालयांत गेलों. सेनाधिकाऱ्यासमवेत सवनीसांनीं कांहीं लिखापढी केली. आमच्या नांवें खोल्या राखल्या गेल्या. माडगूळकर व मी टकमकां सभोवार पाहण्याचें काम करीत होतों. हें केंद्र म्हणजे तसें यात्रास्थळच होतें. येथून अनेक स्थळांकडे जाणाऱ्या गाड्या सुटत होत्या. व अनेक स्थळांहून गाड्या येथें येत होत्या. 'इंडियन एअर लाईन्स'चें कार्यालय येथेंच होतें. वेगवेगळ्या सरकारी सहलींच्या प्रवासपत्रिका येथेंच मिळत होत्या. अडल्यापडल्या पांथस्थाला निदान चोवीस तास आसरा देणें हें ह्या प्रवासी केंद्राचें कार्य होतें. दर माणशीं प्रतिदिवशीं सहा रुपये केवळ राहण्याचें भाडें व अंथरूणपांघरुणाचा वेगळा दीड रुपया हा येथील दर होता. पोटपूजेसाठीं शेजारींच उपहारगृह होतें. तेथें इच्छा होईल तेवढें द्रव्य वेचावें. इच्छामात्रेंकरून ह्या अतिथीकेंद्रांतला आपला रहिवास लांबवितां मात्र येत नसें. त्यासाठीं स्वतंत्र अनुज्ञा मिळवावी लागे. अशी अनुज्ञा मिळणें किंवा न मिळणें हें यात्रेकरूंची गर्दी असणें किंवा नसणें व पदरीं विशेष पुण्याई असणें वा नसणें ह्यावर अवलंबून होतें. आमच्या पुण्याईविषयीं प्रश्नच नव्हता. आम्हांला जागा मिळाली. आम्ही पुण्यवान पाहुणे म्हणून मिळाली व गर्दी विशेष नव्हती म्हणूनहि मिळाली. परतीच्या वेळीं दोन दिवस राहतां यावें अशीहि व्यवस्था आगाऊ करून ठेवली. आणि मग भाटिकांनीं आमचें सामान आमच्या खोल्यांत नेऊन ठेवलें. आमच्या अधिकारी मित्राचा आम्ही तात्पुरता निरोप घेतला. स्नान भोजनादि आटोपून आम्हांस लेफ्टनंट कर्नल मैत्रांच्या कार्यालयांत जावयाचें होतें. हें आमचे खरे पालक व मार्गदर्शक होते. त्यांच्याच सहवासांत आमचा पुढचा प्रवास पार पडावयाचा होता. म्हणून त्यांच्या भेटीची वेळ तत्परतेनें पाळणें आवश्यक होतें. श्रमपरिहारार्थ जें कांहीं करावयाचें तें सर्व करून योग्य वेळीं आम्ही मैत्रमहाशयांसमोर उपस्थित झालों.

विनयभूषण मैत्र ह्या वंगदेशस्थ सद्ब्राह्मणाच्या नांवाचे "मोइत्रा" हें भ्रष्टीकरण उगाचच झालें होतें. ('तापी'चें 'टॅप्टी' किंवा मथुरेचें 'मुट्रा' ह्या चालीवर.) त्यामुळें ते पंजाबी कीं बंगाली असा भ्रम अकारणच उत्पन्न होत होता. बाबूजींचे उच्चार मी ऐकले व मनाशीं खूणगांठ बांधली कीं हे सद्गृहस्थ पंजाबी नव्हत निश्चित (पंजाबशीं ते विवाहबंधनानें निगडित झाल्याचें लवकरच आम्हांस कळलें.)

"आपण पूर्वबंगालचे कीं पश्चिमबंगालचे ?" असा चतुर प्रश्न मी त्यांना विचारला तेव्हां "आपण पूर्वबंगालचे असल्याचं त्यांनीं मला सांगितले. नौखालीपासून पूर्व बंगालविषयीं मला विशेष प्रकारची आपुलकी वाटते. तीच आपुलकी मला मैत्रमहाशयांविषयीं वाटली. त्यांनींहि शेवटपर्यंत माझ्याशीं विशेष आपुलकीचें वर्तन ठेवलें. मी सर्वांत वडील ह्या कारणास्तव त्यांतल्या त्यांत चांगले आसन ते मला देत. त्यांतल्या त्यांत बरी शय्या माझ्या वाट्यास येई. निदान वयानें तरी मी वडील आहे ही गोष्ट त्यांनीं सतत ध्यानांत ठेवली होती. पण तो पुढील कथाभाग झाला. ह्या क्षणीं मैत्रमहाशय भिंतीवर टांगलेल्या लडाखच्या मानचित्रासमोर उभे होते. हातांत हातभर लांबीची टोंकदार काठी घेऊन एखाद्या भूगोल-शिक्षकाच्या पावित्र्यांत ते आम्हांला लडाखचा इतिहास व भूगोल समजावून सांगत होते. आम्ही त्यांना जिज्ञासु विद्यार्थ्या-

## धैर्यमेरू मदनलाल डिंग्रा



[ फांशी—१७ ऑगस्ट १९०९ ]

**सावरकर प्रभृतींनीं स्थापन केलेल्या "फ्री इंडिया" सोसायटीच्या व्याख्यानें, चर्चा इत्यादि कार्यक्रमांना अधुनमधून मदनलाल डिंग्रा येत असत. पण व्याख्यानें वगैरेंचा त्यांना कंटाळा होता. सावरकरांवर मात्र त्यांची फार श्रद्धा होती. त्यामुळें त्यांच्या व्याख्यानांना मात्र ते जात. व्याख्यानें देणारी माणसें बडबडी असतात अशी त्यांची धारणा होती. त्यामुळें त्या कार्यक्रमाची मदनलाल कित्येकदां टिंगलही करीत असत. जपानी शौर्याबद्दल गोष्टी बोलल्या जात असतांना, कोणी तरी इसमानें हिंदु राष्ट्राबद्दल अधिक्षेपाचे उद्गार काढले. त्याबरोबर धिंग्रा चवताळून उठले व म्हणाले "माझें हिंदुराष्ट्रही तितकेंच शूर व साहसी आहे व लवकरच आमच्याही धाडसाची लोक कीर्ति गाऊं लागतील" शेवटीं वाद पैजेवर गेला. व साहसाची चुणूक पाहण्याचें ठरलें. एक टांचणी घेऊन मदनलाल डिंग्राजींच्या हातावर टोंचण्यास आरंभ झाला. डिंग्रांनीं हात तसाच अटळ ठेवला होता. टांचणी सर्व आंत रोवली गेली व रक्त बाहेर उसळलें तरीही डिंग्रानें हात हलविला नव्हता.**

**भारतभवनाच्या तिसऱ्या मजल्यावर असलेल्या माळ्यासारख्या खोलींत बाँब तयार करणें, बाँबसाठीं लागणारीं रसायनद्रव्यें बनविणें इत्यादि कामें गुप्तपणें चालत. एक अपरात्री हें काम चालू असतांना सावरकरांच्या हें लक्षांत आलें कीं, तापत चाललेलें कांचेचें भांडें आगीवरून खालीं उतरून घेण्याची तर वेळ आली आहे व तें उतरण्याचा चिमटा जवळ घेतलेला नाहीं.—उष्णतेची आंच अधिक लागली तर भांडें फुटेल व रासायनिक द्रव्यांचा एकदम स्फोट होऊन सर्वच बिंग बाहेर फुटेल अशी भीति होती. हा प्रसंग टाळण्यासाठीं काय युक्ति योजावी हा प्रश्न सावरकरांच्या मनांत घोळत आहे, तोंच मदनलालनें बेडरपणानें हात पुढें केला व भांडें घट्ट धरून खालीं उतरून ठेवलें. तळहाताची कातडी पोळून निघाली, तरी मदनलालचे त्याकडे काडीमात्र लक्ष नव्हतें.** •••

प्रमाणें प्रश्न विचारीत होतों व ते आम्हांला उत्तरें देत होते. लडाखी लोक स्वभावानें मवाळ आहेत. तेथें वर्षाला सरासरी तीन इंच पाऊस पडतो. लडाखी स्त्री पूर्णपणें स्वतंत्र आहे. म्हणजे जरा जास्तच स्वतंत्र आहे. ती एकापेक्षां अधिक पती (एकाच वेळीं) करूं शकते व करते. तेथील प्रमुख धर्म दोन. बुव्दधर्म व इस्लाम. लडाखमध्यें थंडी अतिशय आहे. थंडीच्या दिवसांत कॉफीचा कप तोंडाला लावावा तर कॉफीचें आईस्क्रीम तोंडांत येते. फळें वर्फाच्या खडकासारखी होतात, इत्यादि अनेक मनोरंजक व भीतिप्रद गोष्टी त्यांनीं आम्हांला सांगितल्या. लडाखी थंडीच्या गोष्टी ऐकून तर आम्ही येथल्या येथें गारठलों व मैत्रमहाशयांना विचारलें,

"लडाखमध्यें तुम्ही म्हणतां ती थंडी पडूं लागली आहे कां हो?"

त्यावर त्यांनीं उत्तर दिलें "नाहीं, अद्याप लडाखमध्यें खरी थंडी पडूं लागलेली नाहीं, पण यंदा लडाखमधला हिंवाळा जरा लवकर सुरू झाला आहे."

"जरा लवकर" सुरू झालेल्या हिंवाळयांतली खरी नसलेली थंडी किती असते त्याचा आम्ही लवकरच अनुभव घेतला. आणि तूर्तास मैत्र महाशयांनीं लडाखविषयीं दिलेलें टंकलिखित टिपण खिशांत घालून त्यांना तात्पुरता नमस्कार केला.

लडाखमध्यें थंडी असेल तितकी असो, पण श्रीनगरमधली थंडी सुसह्य होती. मला तर ती सुखाची सुध्दां वाटत होती. एक गरम बंडी, गरम हातमोज्याचा व पायमोज्यांचा एक जोड, आणि रात्रो दोन ऊनी पांघरुणें येवढी सामुग्री श्रीनगरच्या थंडीला पुरेशी होत होती. पण लडाखमध्यें येवढयानें काम भागणार नाहीं. तेथें जाड पायमोज्यांचे निदान दोन जोड लागतील, माकडटोप्या लागतील, आणखी सारें ब्रह्मांड लागेल असे मैत्रमहाशयांनीं आम्हांला बजावून सांगितलें होतें. तेव्हां त्या कामासाठीं पुनः श्रीनगरचीं विकानें पाहाणें आलें. श्रीनगरांत शालींची, फळांची, "पेपरमाशी" वस्तूंची विकानें भरपूर. हौशी प्रवासी हे ह्या विकानांचे व एकूण काश्मिरचेच मोठे आश्रयदाते. ह्या आश्रयदात्यांतच आजहि आम्ही जमा झालों. व एकेका विकानाच्या पायऱ्या चढूं-उतरूं लागलों. इथें कुणी घरवालीसाठीं शाली घेतल्या, कुणी बाबालोकांसाठीं अंगडी टोपडीं घेतलीं, कुणी आक्रोडाच्या लाकडाचे डबे घेतले. कुणी कांहीं, कुणी कांहीं. विकानांतल्या वस्तूंच्या मोहिनीला फारसे बळी पडले नाहींत पु. ल. देशपांडे व मी स्वतः खिसे उलटे होईपर्यंत वस्तू विकत घेत बसण्याचा माझा मूळचा स्वभाव आहे. पण ह्या वेळीं मी संयम केला. लडाखहून परत आल्यावर काश्मिरांत कांहीं दिवस राहण्याचा माझा विचार होता. आणि हें राहणें शासकीय व्ययानें होणारें नव्हतें. म्हणून माझ्या खिशांतलें द्रव्य विकानवाल्याच्या खिशांत जमा न होऊं देण्याची मी काळजी घेतली. काश्मिरी माणसें तशीं नरम आहेत. पण चामडयांच्या वस्तूंचें विकान मांडून बसलेल्या एका मियाभाईनें आम्हांला वेगळा अनुभव दिला. टोळीनें आम्ही त्याच्या विकानांत शिरलों. तेव्हां तंगतोकडी विजार घातलेल्या एका गौरांगनेशीं लाचारीनें बोलण्यांत तो "मशगूल" झालेला होता. त्याच्या आराधनेंत आमची त्याला अडचण वाटली. प्रथम त्यानें आमची उपेक्षाच केली. आम्ही उपेक्षा करून घ्यायला सिद्ध नाहीं हें पाहिल्यावर त्यानें उर्मटपणाचा सूर लावला. पिशव्या, टोप्या, कातडी मौजे ह्यासारख्या वस्तू समोर मांडल्या; पण आदळ आपट करीत. जणुं आम्ही शहाजोग गिऱ्हाईक नव्हतों तर कुणी जोगवा मागणारे होतों. त्याचा तो आविर्भाव पाहून आम्ही अस्वस्थ झालों. आमचे चेहरे पालटले. देशपांडयांच्या नाकपुडया थरथरल्या. पुन्हां तो विकानवाला "लेडी साहेबा"कडे वळला. आम्हांला त्यानें अगदींच "कंडम" ठरविलें. आम्ही चिकित्सा करीत होतों, भाव विचारीत होतों. तें त्याला मान्य नव्हतें. कुठल्या तरी प्रश्नाला त्यानं पुन्हां गुरकावून उत्तर दिलं आणि मग नवल वर्तलें.

देशपांडयांच्या थरथरणाऱ्या नाकपुडया एकदम फुगल्या, आणखी फुगल्या, आणि मग स्फोट झाला. टोप्या, मोजे, पिशव्या ह्यांचा ढीग देशपांडयांनीं दोन्ही हातांनीं गोळा केला व त्या माजोरी माणसाच्या अंगावर उधळून दिला.

"तुला तुझ्या पार्श्वभागावर एक लाथ पाहिजे काय?" त्या गोऱ्या बाईसमोर मचापासून शेपूट हलवतो आहेस, आम्हांला तूं कोण समजलास?" असें कांहींसें ते आंग्ल भाषेंत बोलले. मूळचे शब्द मी येथें देत नाहीं. लंडनच्या पूर्वभागांत ते जोरकस शब्द प्रचलित असावेत. शब्द जरा "स्लँग" होते. पण ह्या प्रसंगाला तेच शब्द योग्य होते. शब्दांचा अर्थ विकानवाल्याला उत्तम प्रकारें समजला. (देशपांडयांचे शब्द माभिनय होते.) तो 'आ' वासून आमच्याकडे पहात राहिला. हातघाईवर येण्याची त्याची छाती नव्हती.

आम्ही तडक बाहेर आलों. देशपांडे अद्याप रागानें कांपत होते. त्यांच्या सात्विक संतापाचा येवढयांत हा दुसरा स्फोट मी पहात होतों. देशपांडयांचा हा अवतार मला नवा होता. सहसा ते रागावत नाहींत, अशीच माझी आजवर कल्पना होती. माणसानें रागवायचें तेथें रागावलेंच पाहिजे, रागाची कृतीहि अवश्य तेथें त्याच्या हातून घडावयास पाहिजे, असें माझें मत होतें. देशपांडे आज रागावले होते. केवळ मनांतल्या मनांत न रागावतां रागाची कृतीहि त्यांनीं केली होती. त्या उर्मट विकानवाल्याच्या तोंडावर त्याच्याच वस्तू त्यांनीं फकल्या होत्या. फेकल्या गेलेल्या त्या वस्तू पाहिल्यावर देशपांडयांविषयीं मला अतोनात कौतुक वाटलें. "अपूर्वाई"पेक्षां देखील ह्या कृतीची अपूर्वाई मोठी होती. वाढत्या वयाबरोबर देशपांडयांचा राग वाढला होता. तो राग अतिशय सात्विक होता. मला वाटलें, देशपांडयांचा राग असाच वाढत गेला, तर एक दिवस ते एकटेच साऱ्या चिन्यांना हिमालयापलिकडे फेकून देतील.

ह्या कृतीभोवतीच नंतर आमचें बोलणें फिरत राहिलें. चिन्यांची कृति, आमची कृति, काश्मिरची प्रकृति, इत्यादि! त्या सगळया बोलण्याचाच एक ग्रंथ होण्यासारखा आहे. टिपून ठेवण्यासारखें तें सारें बोलणें होतें. बोलणारी मंडळी एकापेक्षा एक बाकीं






अनुक्रमणिका

होती. प्रकट कार्यक्रम असता, तर भारी मोल देऊनहि माणसांनीं तें बोलणें ऐकलें असते. परंतु आम्हांला केवळ बोलावयाचेंच नव्हतें. जमेल तेवढें पहावयाचेंहि होतें.

दीडदोन दिवसांत आम्ही काश्मिरचें पाहणार तरी काय ? परंतु आमचा प्रवास ही 'काश्मिरची सहल' मुळांतच नव्हती. दिवस तर पाहतां पाहतां गेला. सायंकाळच्या संधिप्रकाशांत आम्ही 'मोंगल उद्याना' पैकीं एकदोन पाहिलीं. 'दल' सरोवराचें धांवतें दर्शन घेतलें. परत आल्यावर दल सरोवरावर मी सांग्रसंगीत फिरलों. 'शालिमार', 'निशात' आदि झाडून सारीं उद्यानें पाहिलीं. उद्यानें चांगलीं आहेत. पण त्यांचाहि एक सांचा आहे. काश्मिरांत कुठेंहि जा–एखादें 'शालिमार' तुम्हांस भेटतें. नाविन्य संपतें. व नाविन्य संपतांच कौतुक आणि कुतूहलहि ओसरूं लागतें. आज त्या कौतुकाचा प्रारंभ होता. आणि तें कौतुकहि आम्ही अर्धअंधेरांत पहात होतों.

त्या अंधेरांतहि माळी फुलांचे गुच्छ घेऊन आमच्या समोर धांवत आले. मोकळ्या मुठीच्या माडगूळकरांनीं एकाला एक रुपया दिला. तोंच दुसरा समोर धावला. मग तिसरा. काश्मिरांत हा अनुभव वारंवार येतो. कर्णाचेंहि सत्वहरण करील असा हा प्रकार आहे. "वक्षा-वक्षीस !" हे कित्येक काश्मिरकरांचें घोषवाक्य आहे. ते कशासाठीं बिंदागी मागतील ह्याचा कांहीं नियमच नाहीं.

लडाखहून परत आल्यावर मी श्रीनगरजवळ एक केशराचें शेत पाहिलें. शेतकऱ्यानें मला एका बोटानें केशराचा कंद दाखविला व दुसरा हात समोर पसरून तो ओरडला "वक्षीस !" म्हणजे नुसतें एखादें झाड दाखविण्यासाठीं हे लोक बक्षीस मागतात. बरें, हे लोक काय मागतील ह्याचाहि कांहीं नियम नाहीं. प्रवासी केंद्रांतल्या एका फेटेवाल्या चाकरानें "फार थंडी पडली आहे" ह्या कारणास्तव आमच्याजवळ 'व्हिस्की'ची निस्संकोच मागणी केली. बरें, दिलेल्या द्रव्याला तो जागला म्हणावें, तर तसेंहि नाहीं. दुसऱ्या दिवशीं प्रात:काळीं सामान उचलायची वेळ आली तेव्हां, जड सामान आमचें आम्हीं उचललें, आणि हा पानप्रिय सेवक एक हलकीशी पिशवी हातांत घेऊन आमच्या मागून डुलत डुलत आला. हरीसिंग महाराजांच्या राजपरिवारांत दिवस घालविल्यामुळें जड सामानाला हात लावणें त्याला कमीपणाचें वाटत असावें. ह्याच खावू परंपरेंत अनेक काश्मिरी लोक रुळले आहेत. इतरांनीं त्यांचा भार उचलावा व त्यांनीं मनसोक्त वागावें असें त्यांचें वळण आहे. केवळ दारिद्र्यामुळें हें घडत नाहीं. दरिद्री माणसें स्वाभीमानी असूं शकतात, निस्पृह व न्यायी असूं शकतात. हा एकेकाचा परंपरादत्त स्वभाव आहे. उद्यानांतला तो माळी ह्या स्वभावाचा एक प्रतिनिधी होता. उद्यान सुंदर, माणसेंहि सुंदर, पण त्यांचें वर्तन सुंदर नव्हे. ही लाचारी पाहिली म्हणजे निष्कांचन मराठी माणसाचा तुटक अहंकारहि बरा कीं काय असें वाटूं लागतें. परंतु हेंहि खरें कीं काश्मिरांतील कांहीं माणसें कांही दिवस पाहून त्यांचेविषयीं मत बनविणें बरोबर नव्हे. शितावरून भात समजतो आणि समजतहि नाहीं. परंतु ही पारख करावयास जास्त काळ आम्हांस श्रीनगरांत थांबावयाचें नव्हतें.

"पहांटे बरोबर साडेपांचच्या ठोक्याला वाहनें घेऊन येतों. केंद्राच्या दाराशीं सामान घेऊन सिद्ध रहा" अशी सूचना ले. कर्नल मैत्रांकडून मिळालेली होती. श्रीनगरांत अधिक कांहीं पाहणें शक्यच नव्हतें. परंतु वेळांत वेळ काढून आम्ही आमचे एक एकत्र छायाचित्र तेवढें त्या सायंकाळीं काढून घेतलें. छायाचित्रकार दत्त नांवाचे भारदस्त पंजाबी गृहस्थ होते.

ते आपली सिद्धता करीत असतांच झटकन् मी मागच्या अंगानें बाहेर पडलों. व शेजारीच वाहणाऱ्या झेलमच्या बांधावर जाऊन उभा राहिलों. हिरवट पाण्याच्या झेलमचें मी घेतलेलें तें पहिलें दर्शन. नदीच्या पात्रांत अनेक घरनावा (हाऊस-बोट्स) व शिकारे तरंगत होते. प्रत्येक नावेला व शिकाऱ्याला स्वतंत्र नांवें होतीं. अनेक नांवें इंग्लिश होतीं. पैकीं एक नांव होतें 'सफरिंग मोझेस' (Suffering Moses). कां कोण जाणे, तें नांव माझ्या आठवणींत एकदम रुतून बसलें. मोझेस दु:खी होता खराच ! काश्मीर अस्वस्थ होतें, हिंदुस्तान कष्टी होता. (Suffering Moses!) सारखें तें नांव माझ्या मनांत फिरत राहिलें.

झेलमच्या लांबून येणाऱ्या व लांबवर जाणाऱ्या प्रवाहाकडे मी पहात राहिलों तोंच माझ्या नांवानें हाकाटी झाल्याचें मी ऐकलें. छायाचित्रकारासमोर मुकाट्यानें येऊन मी उभा राहिलों (म्हणजे बसलों). ते आमचे मित्र निघाले. मला ठाऊक आहे कीं दूर श्रीनगरांत निघालेलें आमचें हें छायाचित्र आमच्यापैकीं प्रत्येकजण जपून ठेवणार आहे. ह्या छायाचित्रावर आमच्यापैकीं प्रत्येकाची स्वाक्षरी आहे. पुन्हा आमचें असें छायाचित्र कधीं निघेल कीं नाहीं ह्याविषयीं शंका आहे. आणि श्रीनगरांत आम्हां सर्वांचें छायाचित्र निघण्याचा संभव फारच कमी आहे. एखाद्या शुभप्रसंगीं तसें तें निघावें, अशी इंच्छा मात्र बलवत्तर आहे.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही श्रीनगर सोडलें. माणसाचें मन ही एक विलक्षण वस्तु



अहो हें काय, शिडी मोडेल कीं . . . .

आहे. पहाटें आपोआपच आम्हांला जाग आली. रात्रीं उत्तमपैकी "मंत्रजागर" झाला असूनहि जाग आली. आम्ही प्रातर्विधी आटोपले, व प्रवासी केंद्रांच्या दाराशीं आपापलीं बोचकीं घेऊन उभे राहिलों. ले. कर्नल मैत्र व त्यांची वाहनें अंमळ उशीरा येऊन पोहोंचलीं.

"क्षमा करा, वाहनाची व्यवस्था करायला जरा उशीर लागला." मैत्र महाशय म्हणाले. उशीर आमच्याकडून झाला नाहीं ह्याचा आम्हांला आनंद वाटला. अगदीं वेळेवर आम्ही सिद्ध होतों. उपहारगृह उघडलें नव्हतें. चहा न घेतांच आम्ही सैनिकी विमान-तळावर गेलों.

"कँटीनमध्यें जाऊन चहा घेऊन या" मैत्र महाशयांनीं आम्हांला सांगितलें. परंतु कॅण्टीन उघडलें नव्हतें. (तो दिवस बहुधा कसल्यातरी सुट्टीचा होता.) तसेच आम्ही विमानांत बसलों व लेहच्या दिशेनें निघालों.

"हें कोणत्या जातीचें विमान ?" मी मैत्र महाशयांना विचारलें,

"हें इल्युशियन आहे." मैत्र महाशयांनीं तत्परतेनें उत्तर दिलें. माझ्या प्रत्येक प्रश्नाचें उत्तर ते तितक्याच तत्परतेनें देत होते. माझ्या प्रश्नांना न कंटाळता उत्तरें देणारे जगांत कोणी आहे हें पाहून मला आनंद वाटला.

पाहतां पाहतां आम्ही अंतराळांत वर चढलों. झेलम, दल व सारें श्रीनगर आम्हांला पायातळीं दिसलें. हरीपर्वत दिसला. पूर्ण परिचयाची झालेली ती शंकराचार्यांची टेकडी दिसली. टेकडीवरचें मंदिर दिसलें. तें मंदिर व ती टेकडी पाहून माझें मन पुन: एकदां हललें. सभोंवार अंधेर मातला असतां एखाद्या ताऱ्याप्रमाणें मंदिरशिखरांवर तळपत बसलेल्या त्या आशेच्या एकट्या दीपकाकडे आमच्यापैकीं प्रत्येकानें पाहिलें होतें. दूरस्थ केरळांतले आचार्य येथवर आले होते. धर्मानें त्यांना प्रेरणा दिली होती, बळ दिलें होतें. कालडीच्या त्या प्रतापसूर्यानें नव्हत्याचें होतें करून दाखविलें होतें. आतां आज पुनश्च तसेच कांहीं कोणी करून दाखविणें होतें. तशाच निष्ठेची व धर्मबुद्धीची आज आम्हांस आवश्यकता होती. मनोमन मी टेकडीवरील शंकराला व शंकराचार्यांना नमस्कार केला. **(क्रमशः)**













# मरणांत खरोखर जग जगते

## क्रांतिकारक आणि विनोद

क्रांतिकारक हा स्थितप्रज्ञ असतो. असावा लागतो. रक्त लवकर तापतें आणि कार्यसिद्धीनंतर तें लवकर थंडही होऊन जातें. वायलीचा खून केल्यानंतर मदनलाल धिंग्राला अटक केली तेव्हां त्याची नाडी 'नॉर्मल' होती. छाती धडधडत नव्हती. डॉक्टरांनीं त्याला तपासलें. त्याची ती स्थिति पाहून त्यांना आश्चर्य वाटलें.

वंगालचा क्रांतिवीर खुदीराम बोस ह्याचें नांव ठाऊक नाहीं असा भारतीय विरळा! सोळा वर्षांच्या हा कोवळा पोर! क्रांतिप्रयत्नांवर श्रद्धा बाळगणारा! फिरून जन्म मिळा-लाच तर तो भारतीचें स्तन्य प्यायला मिळावें अशी कांक्षा बाळगणारा ! त्याच्या स्थितप्रज्ञ वृत्तीची ही 'सुरस' कथा!

फांशीची शिक्षा झालेला खुदीराम आपल्या कोठडींत पडून होता. फांशीच्या आदल्या रात्रीची गोष्ट! अंतिम इच्छा काय हें जाणून घेण्यासाठीं व प्रकृतीची तपासणी करण्यासाठीं जेलचे डॉक्टर व अन्य अधिकारी त्याच्या कोठडींत गेले. त्यांनीं त्याची तपासणी केली. जणुं कांहीं भयानक घडणारच नव्हतें. त्याची जीवित यात्रा जणुं उद्यां संपणारच नव्हती. अशा थाटांत तो होता. त्याची प्रकृति अगदीं 'नॉर्मल' होती.

परततांना डॉक्टरांनीं एक छानसा आंबा त्याला दिला आणि ते म्हणाले. "उद्यां फांशी जाशील. ह्या जगांतलें कांहीं तुला पहायला, खायला मिळणार नाहीं. हा आंबा खाऊन टाक!"

खुदीराम हंसला, त्यानें तो आंबा घेतला. तुरुंगाधिकारी निघून गेले.

दुसऱ्या दिवशीं पहांटे सारीं मंडळी पुन्हां त्याला भेटायला व फांशीच्या स्तंभाकडे न्यायला म्हणून आलीं. त्यावेळीं "सारें कांहीं झालें काय?" म्हणून विचारतांच त्यानें होकार दिला. तेवढ्यांत डॉक्टरचें लक्ष कोपऱ्यांत गेलें. त्यांनीं दिलेला आंबा तसाच ठेवलेला त्यांना दिसला.

"हें काय? मुद्दाम आवर्जून दिलेला आंबा खाल्ला नाहींस?" खुदीराम हंसला. त्यानें "तो बघा व घेऊन जा" असें सांगितलें.

शिपायानें आंबा घेण्यासाठीं म्हणून हात पुढें केला.

त्याच्या हातीं साल आणि कोय आली. रस चोखून घेऊन खुदीरामनें तो आंबा जसा दिला तसाच जुळवून ठेवण्याची किमया केली होती. सारे फंसले आणि खुदीराम हंसला——

मरतांनाही — ★★★

## 'ते काय बंधु असतो—

'जॅक्सन खून खटला' गाजला आणि गणेश दामोदर सावरकर (बाबा) यांना जन्मठेपेची शिक्षा झाली. अंदमानांत कोलू घाणा त्यांच्या वांटयाला आला. निदान तात्या तरी (बॅ. सावरकर) बाहेर आहे. तो क्रांतिप्रयत्नांचें नेतृत्व करीत आहे हें समाधान मानून त्या साऱ्या यमयातना बाबा सहन करीत होते.

पण एक दिवस अंदमानांत वार्ता पसरली. "कोणी बालि-स्टर बाबू पन्नास वर्षांची शिक्षा होऊन "सिल्व्हर जेलमध्यें आला आहे."

"तो तात्या तर नसेल?" म्हणून बाबा चिंतेत पडले. तो कैदी 'तात्याच' होता.

आणि मग कैदी घुमटीकडे जात असतांना ह्या दोन बंधूंची भेट झाली. "तात्या, तूं इथें कसा आलास?" म्हणून बाबांनी प्रश्न केला. पण उत्तर देण्याची सवडच नव्हती. कैदी पुढें सरकले होते.

मग दुःखाच्या उमाळ्यांनी भरलेली एक चिठ्ठी बाबांनी तात्यांना लिहिली. "तूं बाहेर कार्य यशस्वी करशील, प्रिय हिंदुस्थानचें——ही मला कोण आशा होती. त्या आशेनें मला काळेपाणी झालें त्याचें कांहींच वाटेना. मन त्या संकटांस कस्पटासमान लेखी....पण आतां कार्याचें कसें होईल?.....तूं इथें कसा आलास ?

तात्याची योग्यता ते जाणत होते. तें कर्तृत्व आतां वांया जाईल या एकाच विचारानें ते अस्वस्थ झाले होते.

उत्तर देतांना तात्यांच्या सहनशक्तीला विलक्षण ताण पडला. पण स्वतःचें दुखः गिळून तात्यांना धीराचे शब्द सांगणें भाग होते. ती वृत्ति त्यांनीं बाणून घेतली होती. म्हणून त्यांनीं लिहिलें "बाबा, यशापयश या योगायोगाच्या गोष्टी आहेत. लढतां लढतां पहिल्याच चकमकींत आपला पाडाव झाला यांत आपला दोष कसला? उलट "सीदन्ति मम गात्राणि" अशी स्थिति कर्तव्याचें रणशिंग फुंकलें जातांच आपली झाली नाहीं हीच आपली थोरवी! ज्या दुःखांना भोगावयाला आपण इतरांना सांगत होतों, तींच दुःखें स्वतःवर येतांच आपण तीं निर्भयपणें भोगलीं यांतच आपला गौरव! हीं संकटें सोसणें आणि असें कारावासांत सडत राहणें कोणासही नकळत, ज्यांच्यासाठीं हे कष्ट सोसले त्यांचेहि शिव्याशाप खात असें मरणें हेंच आतां आपल्या आयुष्याचें ध्येय!

आणि कार्याच्या हानीविषयीं विचाराल तर मी इतकेंच म्हणेन कीं, भारतीय स्वातंत्र्यसमर आम्हांविना थांबणार नाहीं!

सारथी तिचा अभिमानी ! कृष्णाजी आणि राम सेनानी
अशी कोटि नव सेना ती आम्हांविना थांबेना ●●●

















अनुक्रमणिका

# मोरू ही पहा आमची मुंबई

—जयवंत दळवी

'मोरूनें मुंबईच्या इतिहासाची प्राथमिक ओळख करून घेतली. आतां तो भूगोलाकडे वळला आहे. सोबत त्याचे अडचणींत टाकणारे प्रश्न आहेतच...' श्री. जयवंत दळवी ह्यांची ही चुरचुरीत व मराठी वाचकांत लोकप्रिय झालेली तुफान विनोदी लेखमाला....

**मोरू**; आज आपण मुंबईच्या भूगोलाचा थोडा फार विचार करूं. भूगोल म्हटला कीं —

भूगोल म्हटला कीं, मामा, जांभई येते!

ती सोडली, तर भूगोल म्हटला कीं भूप्रदेश, पिकें, हवापाणी या गोष्टी आल्याच.

आणखी नकाशा हवा!

होय मोरू! भूगोलाचा विचार करतांना नकाशा हवाच. तसा आपण सात ठिपक्यांचा नकाशा पाहिला आहे. तो जुन्या मुंबईच्या सात बेटांचा नकाशा. पूर्वी सागराला भरती आली कीं या बेटांची संख्या कमीअधिक होत असे. पण सांप्रत जनसागराला तुफान भरती आल्यामुळें मुंबई कोठून सुरू झाली आणि कोठें संपली हें कोणालाहि माहीत नसते. या मुंबईला आतां महामुंबई म्हणतात. प्राथमिक शाळेंतील क्रमिक पुस्तकांत महामुंबईचा नकाशाहि दिला जातो. भूगोलाचें पुस्तक म्हटलें, कीं नकाशा हा दिलाच पाहिजे. पण मुंबईचा म्हणा अगर महामुंबईचा म्हणा खरा नकाशा या जन्मांत कोणाला कधीं करतां येणार नाहीं. एवढा या मुंबईचा विस्तार वाढला आहे आणि वाढतो आहे. असो.

तर काय सांगत होतो —

भूगोल म्हटला कीं भूप्रदेश —

होय मोरू! भूप्रदेश! पण मुंबईंत भौगोलिकदृष्ट्या विचार करण्यासारखा भूप्रदेश सुदैवानें नाहीं. मलबारहिल, खंबाला हिल, लोअर परेल, हीं नांवें येथें उंचवटे आणि खोलगट भूभाग असल्याचें सूचित करतात हें खरें. पण येथील भूगोल जरा विचित्र आहे. तसें म्हटलें तर मलबारहिल हा भाग समुद्रसपाटीपासून उंच आहे हें खरेंच. तसेंच लोअरपरळ हा भाग खोलगट आहे हेंहि खरें. कारण पावसाचें पाणी मलबारहिलवर न तुंबतां ते लोअरपरळमध्येंच तुंबतें. त्यामुळें लोअरपरळपेक्षां मलबारहिल उंच आहे असें अनुमान काढावें तर पिण्याचें पाणी मात्र लोअरपरळमध्यें न येतां उंचीवरील मलबारहिलवर चढतें आणि तुंबूनहि रहातें. त्यामुळें भूगोलाचीं सर्वसामान्य अनुमानें मुंबईला लागूं पडत नाहींत.

येथें सपाटीचा प्रदेश सांपडतो तो फक्त रस्त्यांच्या रूपानें. ते सदैव खणलेले असतात हें खरें! पण येथें शेतीचा व्यवसाय नसल्यामुळें जमीन खणणें जमत नाहीं. त्यामुळें रस्ते खणण्यावरच शेतीव्यवसायाची आवड भागवावी लागते.

लोकांचे पाय आणि इमारती यांनींच मुंबईचा भूप्रदेश व्यापला गेल्यामुळें येथें शेतीभाती होत नाहीं. त्यामुळें (कंड्या सोडल्या तर) येथें दुसरें कांहीं पिकत नाहीं. त्यामुळें मुंबईच्या भूगोलाचा विचार करायचा म्हणजे हवापाण्याचा फक्त विचार करावा लागतो. त्यामुळेंच "कुठें? हवा खायेला?" किंवा "तुमच्याकडे नळाला पाणी येते?" असे प्रश्न मुंबईकर एकमेकांस विचारीत असतात.

मोरू! मुंबईंतील हवामान हें सदैव उष्णच असतें. हें बेट पाण्यानें वेढलेलें आहे म्हणून हवा उष्ण असते असें कांहीं म्हणतात. येथील लोकांच्या गचडीमुळें सुद्धां उष्णता वाढली असल्याचा संभव आहे. दुपारीं सूर्य तापला तर फक्त दुपारींच उष्णता वाढेल. पण येथील लोकांची डोकींसुद्धां तापलेलीं असतात. त्यामुळें उष्णतेंत भर पडली तर त्यांत काय वरें नवल,? ऋतुमानाप्रमाणें मार्च, एप्रिल आणि मे हे उन्हाळ्याचे महिने समजले





अनुक्रमणिका

जातात. तशी मुंबईची हवा बारमास उष्णच असते. पण त्यांतल्या त्यांत या तीन महिन्यांतली उष्णता भारी असते. इतकीं कीं, 'असा उन्हाळा आम्ही उभ्य जन्मांत पाहिला नव्हता' असे पन्नाशी-पुढले म्हातारे लोक (येथें पन्नाशीखालचे म्हातारे सुद्धां खूप आहेत!) दरवर्षी सांगत असतात. त्यामुळें या बेटांतली उष्णता प्रतिवर्षी वाढतच असली पाहिजे असें अनुमान काढता येतें.

मामा, मुंबई ही उष्णकटिबंधांत आहे कीं समशीतोष्ण कटिबंधांत?

मोरू! तें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. पण मुंबईकरांचा उष्णकटिबंध मात्र प्रसिद्ध आहे. त्यामुळेंच प्रत्येक खोलींत मुलांची संख्या भरमसाट वाढते आहे. उष्णकटिबंध किमान समशीतोष्ण व्हावा म्हणून आपल्या नगरपालिकेनें ठिक-ठिकाणीं कुटुंबनियोजन केंद्रें स्थापन केली आहेत. त्याबद्दल तिचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. तथापि कुटुंब नियोजन केंद्राच्या समोरच सूतिकागृहें सुद्धां उघडलीं जातात हीं गोष्ट तेवढीशी चांगली नाहीं.

पण मामा! मुलें झालीं तर उष्णता वाढते हें कसें?

शाबास मोरू! चांगला प्रश्न विचा-रलास. अरे, घरांत मुलांची संख्या वाढली कीं निरनिराळ्या कारणास्तव उष्णता वाढत जाते. वर्षभर शाळेच्या फिया भरा-यच्या. प्रगति पुस्तकांतील शून्य प्रगति पाहून सुद्धां पालक म्हणून सह्या करायच्या. शाळेंत आणि घरीं केलेल्या मारामाऱ्या निस्तरायच्या. मार्च-एप्रिलमध्यें मुलांनीं अभ्यास करावा म्हणून त्यांना पहांटे उठ-वायचें. (म्हणजे त्यासाठीं आपल्याला आधीं उठलें पाहिजे!) मुलांना शिक-विण्यासाठीं आपण त्यांचा अभ्यास करा-यचा. आणि तरीहि शेवटीं पोरें कशीबशी पास किंवा नापास. एवढें झालें कीं हीं पोरें मे महिन्यामध्यें बाहेरगांवीं जाण्याची तयारी करतात. या कामीं त्यांना त्यांच्या आयांची सुद्धां फूस असते. वर्षभर चूल आणि मूल केल्यानंतर त्या आपल्या नवर-देवांना 'फूल' करूं पहातात. चांगल्या दोन-तीन महिन्यांच्या पगाराचा चुराडा करून मिरवणूक परगांवीं निघते. त्याआधीं तिकिटासाठीं रांगेंत नंबर लावावा म्हणून रात्रींपासून एस्टी किंवा रेल्वे तिकीट ऑफिसपुढें झोपावें लागतें. जातांना आणि येतांना गाडींतल्या बेसुमार गर्दीमुळें हाडांचे खुळखुळे होतात. यापुढें मे महिन्यामध्यें प्रवास नको असे निश्चय सुद्धां होतात. पण कांहीं उपयोग नाहीं. मोरू! हें दर-वर्षीचें त्रांगडें आहे. नेमेचि येतो मग पाव-साळा असा जर तुझा समज असेल तर तो चुकीचा आहे. हा मेचा प्रवास सुद्धां नेमेचि येतो.

मोरू! हें सारें तापमान वाढविणारें नाहीं, असें कोण बरें म्हणेल?

याचबरोबर आणखी एक तापदायक विधि याच काळांत पार पाडावा लागतो तो म्हणजे टेक्सबुकें खरेदी करण्याचा. याच टेक्सबुकांना शालेय पुस्तकें अथवा क्रमिक पुस्तकें असेंहि म्हणतात. ही बुकें शाळा सुरू होण्याआधींच घेतली पाहिजेत असा पोरांचा (यांनाच अलिकडे 'पाल्य' असेंहि म्हणतात) हट्ट असतो. पोरांचा हा हट्ट पाहिला कीं, तीं सारी आय. सी. एस्. होतील असें वाटतें. पण तीं होत नाहींत हें सांगायला नकोच. आणि या टेक्सबुकांचा एक गुण असा असतो कीं ती वेळेवर कधींच बुकडेपोंत येत नाहींत. त्यासाठीं आम्हा बापांना (आम्हाला 'पालक' याहि नांवानें संबोधतात!) चार चार खेपा टाकाव्या लागतात. तरीहि टेक्सबुकें छापून तयार नाहींत एवढेंच ऐकावें लागतें. वास्त-विक हीं बुकें महिना दोन महिने उशिरां आलीं म्हणून कांहीं फारसें बिघडत नाहीं जीं पुस्तकें सबंध वर्षभर पोरें वाचत नाहींत, तीं दोन तीन महिनें त्यांच्या हातीं पडलीं नाहींत म्हणून बिघडलें कोठें? पण नाहीं. बुकें पाहिजेत म्हणजे पाहिजेत! एकूण काय नुसता मनःताप! आणखी उष्णता! आणखी घामाच्या धारा!

मोरू! थोडक्यांत सांगायचें म्हणजे मुंबईचा उन्हाळा हा सर्व दृष्टीनें ताप-दायक असतो. येथील नैसर्गिक हवामान उष्ण असतेंच. पण त्यांत अनैसर्गिक उष्ण-तेची अधिक भर पडल्यामुळें येथील उन्हाळा असह्य होतो.

याच वेळीं नळाखालीं डोकें धरून तें थंड करावें म्हटलें तर नळाला पाणीच येत नाहीं. मोरू! म्हणजे दैवदुर्विलास (किंवा दुर्दैवविलास) कसा आहे पहा. वास्तविक मुंबई हें एक बेट आहे. बेट म्हटलें कीं सभोवतालीं पाणी पाहिजे. परंतु या बेटांत तोंडांत घालण्यासाठीं पाण्याचा थेंब नाहीं. वास्तविक पुरेसें गोडें पाणी मिळत नाहीं तर जोडीला खाऱ्या पाण्याचे नळ बसवायला काय बरें हरकत आहे? म्हणजे निदान

**मोरूनें न पाहिलेली मुंबई.**



अनुक्रमणिका

नळाखाली डोकें धरून तें थंड तरी करतां येईल.

मोरू ! आतां तूं येथील पाणी पुरवठयाबद्दल म्हणशील तर आमच्या महापालिकेनें कांहीं करावयाचें बाकी ठेवलें आहे असें म्हणतां येत नाहीं. आपल्या महापालिकेनें याबाबतींत काय काय केलें आहे तें तुला थोडक्यांत वाचूनच दाखवतो.

"आपल्याला नळांतून पाणी मिळतें; पण तें नळांत कोठून येतें ? (कोठें येथें आहे ?) आपल्या म्युनिसिपालिटीनें ठाणें जिल्ह्यांत तानसा व उपनगरांत तुळशी, विहार व पवई असे पाण्याचे चार मोठे तलाव बांधिले आहेत. तेथून मोठमोठ्या नळांनीं त्यांचें पाणी मुंबईंत आणून मलबारहिल व भंडारवाडा हिल यांवरील तलावांत सोडलें आहे. तेथून तें लहान नळांनीं शहरांतील सर्व घरांत खेळविलें आहे. (काय हा जिवाशीं खेळ ! ). शिवाय वरळीहिल व रावळीहिल (शीव-शीव) येथेंहि बाहेरून आणलेलें पाणी सांठवून तें मुंबई शहरास पुरविण्यासाठीं दोन नवीन तलाव बांधिले आहेत."

"मुंबईंतील वस्ती खूप वाढल्यामुळें या चारहि तलावांचें पाणी पुरेना. म्हणून तानसा तलावापासून तीस मैलांवर उत्तरेस वैतरणा नदीस एक मोठें धरण बांधलें आहे. व त्याचें पाणी नळानें तानसांत सोडलें आहे. या सर्व योजना करण्यास अनेक कोटि रुपये खर्च झाले आहेत. म्हणून पाणी जपून वापरलें पाहिजे."

मोरू ! मुंबईंतल्या मराठी शाळेंत लागलेल्या 'माझी मुंबई' या पुस्तकांतून मी हा उतारा तुला वाचून दाखवला. म्हणजे आपली नगरपालिका पाण्यासाठीं काय काय करीत आहे हें तुझ्या लक्षांत येईल. तरी सुद्धां आपले मुंबईकर 'पाणी-पाणी' करीत असतात, इतकेंच नव्हे तर रिकाम्या घागरी घेऊन महापालिकेवर मोर्चे नेतात हें मुंबईकरांना शोभण्यासारखें नाहीं असें नाहीं कां तुला वाटत ?

मुंबईंतलीं मुलें सुद्धां 'ग—म—भ—न' शिकतात तेव्हां 'न' नळांतला हें त्यांना शिकवलें जातें. त्यामुळें नळांतला नकार त्यांना कळायला हवा. पण कळत नाहीं ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय. तलावांतच पाणी नाहीं तर तें नळांत कोठून येणार? निवडणुकीच्या वेळीं मतें द्या—पाणी देतो अशीं आपल्या नगरपित्यांनीं आश्वासनें दिलीं म्हणून काय त्यांना आपण असें कात्रींत धरायचें ? अरे, कांहीं झालें तरी ते सुद्धां शेवटीं 'पिते'च ना ? त्यांना काय पाण्याचें महत्त्व कळत नाहीं ?

पाण्याच्या टंचाईमुळें आम्ही मुंबईकर सदैव संतापलेले असतों. पण तो संताप कमी करावा म्हणून आमची महापालिका वेगवेगळ्या युक्त्याप्रयुक्त्या योजीत असते. पावसाळ्यांत 'तलाव भरून वाहूं लागले' असें वृत्त प्रसिद्ध करते. त्यामुळें निदान पुढलें वर्ष पाण्याच्या दृष्टीनें बरें जाईल असें वाटून मुंबईकर सुटकेचा सुस्कारा सोडतात. त्यानंतर अमुक अमुक जागीं




मोठ्या नळाची दुरुस्ती चालू असल्यामुळें दोन दिवस पाणी कमी मिळणार असें ती जाहीर करते. पण 'अमुक अमुक जागीं' याला फारसा अर्थ नसतो. प्रत्यक्षांत कुठल्याच जागीं दोन दिवस पाणी मिळत नाहीं. तथापि मोठा नळ दुरुस्त होतांच खूप पाणी मिळेल या आशेनें मुंबईकर दोन दिवस कळा (आणि अवकळाहि) सोसतात ! या युक्तीमुळें दोन दिवसांचें लाखो गॅलन पाणी वांचतें. त्यानंतर नागरिकांस अधिक पाणीपुरवठा व्हावा म्हणून ठिकठिकाणीं पाणीपुरवठ्याच्या वेळा बदलल्या जातात. प्रत्यक्षांत कुठल्याच ठिकाणीं कुठल्याच वेळीं पाणी येत नाहीं. त्यामुळें लोकांची दिशाभूल होते. अशावेळीं मुंबईकर गोंधळून जातात आणि ठिकठिकाणच्या आप्तेष्टांकडे "तुमच्याकडे पाणी आलें होतें का ?" अशा चौकशा करूं लागतात.

मोरू ! अशा अनेक युक्त्याप्रयुक्त्या करून आपली कर्तव्यदक्ष महापालिका लोकांच्या संतापावर पाणी घालण्याचा प्रयत्न करीत असते. त्याबद्दल तिचें आपण अभिनंदन करायला नको काय ?

शिवाय मोरू ! या पाण्याच्या प्रॉब्लेमला—

मामा ! प्रॉब्लेम म्हणजे प्रश्नच ना ?

होय मोरू ! पण प्रॉब्लेम म्हटला कीं तो मोठा प्रश्न आहे असें सूचित होतें. तर काय बरें सांगत होतो...

होय मोरू ! पाण्याच्या या प्रॉब्लेमला दुसरी एक आध्यात्मिक बाजू आहे हें आम्ही मुंबईकर विसरलों. पाणी पाणी म्हणजे तरी काय ? जन्म—मृत्यु—पुनर्जन्म असाच तो प्रकार आहे. पाण्याचें बाष्पीभवन होऊन त्याचे ढग होतात. त्या ढगांचें पुन: पाणी होऊन तलावांत पडतें. म्हणजे महापालिका तर तें पाणी कोठें नेऊं शकत नाहीं ना ? पण ज्या अर्थीं मुंबईच्या पाण्याचे ढग तानसा—वैतरणा येथें न पडतां इतरत्र जाऊन गळतात त्या अर्थीं या मुंबईवर ईश्वरी प्रकोप असला पाहिजे असें नको कां आम्ही मानायला ?

मोरू ! पाण्याच्या या टंचाईला आणखी एक चांगली बाजू आहे तिचा आपण विचार केला पाहिजे. कुठल्याहि गोष्टीची टंचाई असली म्हणजे आपल्याला तिचें महत्त्व कळतें. संस्कृत काव्यकारांनीं पाण्याला जीवन म्हटलें आहे. कारण त्यांना पाण्याचें महत्त्व कळलें होतें. पण आपण मात्र पाण्याचें महत्त्व विसरून गेलों होतों. पाणी ही घसघसा ओतायची चीज आहे असें आपण मानत आलों. कोठें चार दमड्या खर्च झाला कीं 'पाण्यासारखा पैसा ओतला' असें आम्ही चार ठिकाणीं ओरडून सांगतों. कुणी अधेली बुडवली तर त्या पैशावर 'पाणी सोडलें' असें आम्ही घमेंडखोरीनें बोलून जातों. भाषेमुळें आम्ही पाण्याचा अनादरच करीत नाहीं काय ? तथापि पाण्याच्या टंचाईमुळें ही भाषा लवकरच बदलेल असा विश्वास वाटतो. कारण पाण्याची टंचाई दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें मुंबईकरांना आज ना उद्यां आत्मसंशोधन करावेंच लागेल.

अनुक्रमणिका

मुंबईंतलीं कांहीं घमेंडखोर माणसें (तसें पाहिल्यास मुंबईंत घमेंडखोर नाहीं कोण?) जेथें संधि मिळेल तेथें 'लाथ मारूं तिथें पाणी काढूं' अशी प्रतिज्ञा पळापळाला करीत असतात. पण याच माणसांवर लोटा-भर पाण्यासाठीं रात्रीं 'खालीं नळ बंद करा रे' अशी विनवणी करण्याची पाळी येते. त्यामुळें मानवानें व्यर्थ प्रतिज्ञा करूं नयेत असा आत्मबोध कालान्तरानें या लोकांना होईल. याबद्दल आपण सर्वांनीं मनोभावें महापालिकेचे आभार मानले पाहिजेत.

पण मामा, जनतेला मुळींच पाणी न देणाऱ्या महापालिकेचे आभार कसे मानायाचे ?

नाहीं रे मोरू ! हा महापालिकेवर अन्याय आहे. महापालिका मुळींच पाणी देत नाहीं असें कसें बरें म्हणावें ? ग्रहणांच्या वेळीं आगाऊ जाहीर करून महापालिका ज्यादा पाणी देते. तुमच्या वस्तींत आग लागली कीं तेथील नळांना पान्हा फुटतो. पण ग्रहण लागणारे चंद्र-सूर्य हे दोनच ग्रह आहेत त्याला महापालिका तरी काय करणार ? ग्रहणें वारंवार येत नाहींत हा काय महापालिकेचा दोष आहे ? तसेंच आग लागलीं म्हणजेच नळांना पान्हा फुटतो म्हणून काय उठल्या सुटल्या आगी लावतां येतात ?

पण मामा ! पाण्याची जर खरोखरच एवढी टंचाई असेल तर अंगांतला पाण्याचा अंश कमी झाल्यामुळें डिहायड्रेशननें मुंबईकर रोडावले पाहिजेत. पण ते तर पाण्याच्या पखालीसारखे भरलेले दिसतात ?

मोरू ! मुंबईकराच्या अंगांत पाण्याचा अंश कमी असतो असें म्हणतां येत नाहीं. 'माझ्या मनगटांत पाणी आहे' अशी घोषणा आम्ही नेहमीं करतों. उन्हाळ्यांत आम्हीं घामाच्या धारा गाळतों एवढेंच नव्हे तर इतर वेळीं जरा कांहीं कुठें झालें तरी आमच्या अंगाला घाम सुटतो. कोणत्याहि सार्वजनिक मुत्रींत चटकन जागा मिळत नाहीं. दुकानांत भज्यांचा वास आला कीं आमच्या तोंडाला पाणी सुटतें. दुःखाच्या प्रसंगीं सुद्धां आमच्या डोळ्यांत खरें अथवा खोटें पाणी येतें. यामुळें हेंच सिद्ध होतें कीं आमच्या अंगांत पाणी असतें—भरपूर प्रमाणांत असतें. याचें कारण असें कीं आम्ही मुंबईकर जमेल त्या प्रत्येक मार्गानें अंगीं पाण्याचा संचय करीत असतों, आणि आम्हास सांगण्यास आनंद वाटतो कीं या कामीं आम्हाला अनेक लोक तत्परतेनें मदत करतात. उदाहरणार्थ, आमचा दूधवाला भैय्या आमच्या घरीं पाण्याशिवाय दूध घालण्याचा निष्ठूरपणा कधींच करणार नाहीं. सर्व फिरण्याच्या जागीं 'सेठ ठंडा जल-पाणी ठंडा सेठ' असा सुक्या तोंडानें कंठ-शोष करीत आपला उत्तर भारतीय भैय्या पाणी घेऊन फिरत असतो. अवघ्या दोन दिडक्या घेऊन पाऱ्याला बावडीचें लोटाभर पाणी तो उदार हृदयानें देतो. सर्व रेल्वे स्टेशनांवर एक निळा पोर्टर (मेघ निळा असतो म्हणून) मडक्यांतलें पाणी तहानले-ल्यांच्या तोंडीं घालतो. आमचे डॉक्टर लोक सुद्धां बाटल्या भरून पाणी देतात, इतकेंच नव्हे, तर तें कमी पडेल या समजुतीनें पाण्याचीं इंजक्शनेंहि देतात. हॉटेलांतला पोऱ्यासुद्धां कपभर चहाचें पाणी मागवतांच आधीं गलासभर पाणी पुढ्यांत ठेवतो. यामुळेंच (दुसऱ्याच्या ओंजळीनेंच पाणी पिणारीं माणसें घरोघर दिसलीं तरी) आमच्या अंगांतलें पाणी कधीं कमी झालेलें नाहीं.

अर्थातच मोरू ! पाणी-टंचाईचे कांहीं फायदे आम्हा मुंबईकरांना मिळाले आहेत. आम्हाला पाण्याची किंमत चांगली कळते. त्यामुळें आम्हीं मुंबईकर सहजासहजीं दुसऱ्याचें पाणी जोखूं शकतों. कोठें पाणी मुरतें आहे तें आम्हाला तात्काळ कळतें. अळवावरचें पाणी म्हणजे काय हें मुंबई-करांस जेवढें कळतें तेवढें दुसऱ्या कोणासच कळत नाहीं. असो.

(क्रमशः)





अनुक्रमणिका



# पाप

—श्रीपाद काळे

**देवघरांत जातांना, पूजाअर्चा करतांना वसुधेचा जीव टांगल्यासारखा होई. ती घाबरे....तिला कळत नव्हतें कीं, आपण कोणतें पाप केलें आहे....तसें नसेल तर तो काळसर्प सळसळत आपल्या समोरून जातांना कां दिसतो...**



**शहरी** वातावरणांत वाढलेली वसुधा सासरीं म्हणून खेडयांत आली. तिचें लग्न शहरांत झालें होतें. तिचा नवरा चांगला पदवीधर होता, आणि त्याला नोकरीहि चांगली होती. शहरांत त्याला स्वतंत्र अशी चांगली जागा मिळाली नव्हती. त्या खटपटींत तो होता. जागा मिळेपर्यंत वसुधेला माहेरीं किंवा सासरच्या गांवीं खेडयांत रहायला हवें होतें... तिच्या नवऱ्याचें खेडयांत मोठें घर होतें. मोठा भाऊ घरीं होता—आणखी एक पाठीं आलेली भावजय होती. घरीं वतन होतें... वसुधेला किती दिवस कोंकण पहायचेंच होतें' कोंकणाबद्दल तिनें पुष्कळ वाचलें होतें सृष्टीसौंदर्य वाचून कोंकण केव्हां बघीनसें तिला झालें होतें—अनायासें कोंकणांत घर असलेलें सासर मिळालें होतें—स्वतःचें घर असणें ही केव्हढी अभिमानाची गोष्ट तिला वाटली होती. तिचें लग्नापर्यंतचें बापाकडचें आयुष्य भाडयाच्या घरांत गेलेलें... स्वतःचें एक घर असावें, अशी तिच्या वडिलांची एकुलती एक महत्त्वाकांक्षा होती. घर मालकावर ते




अनुक्रमणिका





वैतागत असत — भिंतींत एक खिळा मारायचा झाला, तरी त्याला मालकाची परवानगी लागे — वसुधेला स्थळ पहातांना शहरांत राहणारा, पण खेड्यांत शेतीभाती, आणि सत्तेचें घर असावें, असा त्यांचा दृष्टिकोन होता — ही इच्छा त्यांची पुरी झाली होती. लग्नांत वसुधेच्या नवऱ्याचा भाऊ देवक ठेवण्यासाठीं आला होता. तिचा नवरा भावाच्या आज्ञेंत वागत होता• लग्नाच्या वेळीं त्यानें धोतर नेसलें होतें, आणि सारे विधि यथासांग करून घेतले होते — लग्नांत त्याच्या भावानें ऐसपैस खर्च केला होता — वसुधेनें त्याच्याकडें आदरानें पाहिलें होतें, आणि तिला कांहींशी भितीहि वाटली होती — चाळीस पंचेचाळीस वयाचा तो पुरुष उणापुरा उंच होता. हात दणकट होते — डोळे उग्र वाटत होते — मिशा पीळ भरलेल्या होत्या, डोकीवर वारीक केस होते, आणि लांब शेंडी होती. धोतराच्या निऱ्या कातल्यासारख्या होत्या. काळसर रावट वर्णावर पांढरें जाड जानवं उठून दिसत होतें — त्याचें बोलणें करारी होतें — सावेसुधें हंसत खेळत त्याला बोलतांच येत नव्हतें की काय कळत नव्हतें. असा तो नवऱ्याचा भाऊ, म्हणजे वसुधेचा दीर लग्न झाल्यावर दुसऱ्याच दिवशीं परत फिरला होता. त्याचें काम निकडीचें निघालें होतें --

लग्न झाल्यानंतर महिना दोन महिने ती शहरांत होती. तेवढ्यांत तिच्या दीराचीं चार पत्रें तिच्या नवऱ्याला आलीं होतीं. वसुधेला गांवीं पाठवून द्यायला त्यानें हुकूम केल्यासारखें लिहिलें होतें. देवाला जाऊन यायला हवें होते--लग्ना-- नंतरचे कांहीं घराण्यांतले रितीरिवाज पाळायला हवे होते--वसुधेच्या नवऱ्याला रजा मिळत नव्हती. शेवटीं वोटी वंद व्हायची वेळ आली होती व वसुधेच्या नवऱ्यानें गांवाकडची विश्वासू ओळख वघून दिली, आणि आपल्या भावाला उतरून घेण्यावद्दल तार केली.

--वसुधा पहिल्यानेंच कोंकणांत आली. उंबऱ्यावर असतांना तिच्या जावेनें तिच्या पायावर दूधपाणी घातलें. तांदूळ ओवाळून काढले. आणि आंत ये म्हटलें--हें घर तर वाड्यासारखें मोठें होतें. माणसें वेताचीं होती, म्हणून भयाण वाटत होतें.-- या घराला पूर्वीची काहीं आख्यायिका होती. वंद असलेल्या एका वाजूत मोठी विहीर होती. त्याच्याच कडेला भुयार होतें--कैक वर्षांत त्या वाजूचीं दारें उघडलेलीं नव्हतीं--इथें तिथें सारा काळोख होता. पुढच्या वैठकीच्या जागेंतही काळोखच होता--विजेच्या दिव्यांच्या झगझगाटाच्या संवयीमुळें वसुधेला वावरल्यासारखे होत होतें--उगाच कसला तरी भास होत होता. पण वाकीची माणसें हवीं तिथें निःशंक मनानें फिरत होतीं. देवघर मोठें होतें – देव्हाऱ्याच्या खालीं सुध्दां देव होते – वरेच नारळ दिसत होते. धुपाटण्यांतून एक धुराची लहर कायमचीच येत होती. देवघरांत गेल्यावर कोंडल्यासारखें होत होतें. भारल्यासारखें होत होते. तसेंच तुळशीवृंदावनाजवळ – एक वृंदावनाच्या चौथऱ्याचे चिरे फोडून वाहेर आलेल्या पाळांचे औदुंवराचें झाड होतें. वृंदावनांत तुळसच नव्हती. कसलें तरी रानझाड उगवलें होतें. औदुंवराच्या मुळाशीं दोन तीन असोले नारळ ठेवलेले होते – या घरांत सोवळें ओवळें कडक होतें. एवढाही अशुद्धपणा खपत नव्हता. लगेच दाखला मिळत होता. देवघरांत पारोशानीं जायचें नव्हतें. उष्टें खरकटें तसेंच कुठें राहूं द्यायचें नव्हतें. तसेच तुळशीवृंदावना– जवळ वाहेरच्या वाईची सावलीसुध्दां तिथे पडतां उपयोगी नव्हती. वहाणा घालून त्या चौथऱ्याला स्पर्श केलेला खपत नव्हता. घरांतल्या माणसाच्या ती गोष्ट अंगवळणी पडून गेली होती. कुठें पाप घडलें, तर अदृश्य शक्तीचा सततचा त्या वास्तूंत खडा पहारा होता– तिच्या दीराचें देवदेवमार्जन मोठें होतें– तिन्हीसांजा तो गार पाण्यानें आंघोळ करून ओल्यानें देवघरांत येई. धूप घाली. तव्यावरचा जळजळीत निखारा दोन वोटांनीं अचूक उचलून धुपाटण्यांत ठेवी. केव्हां केव्हां त्याच्या अंगांत संचार येई– अंग थरथरूं लागे –अशा वेळीं जेवणें व्हायला मध्यरात्र जवळ यायची – वसुधेला घरांतले रितीरिवाज कळले, आणि ती जपून वागूं लागली. पावलें सुध्दां आपलीं नीट पडताहेत की नाहीं, याकडे ती लक्ष देऊं लागली. काहीही पाप न घडल्याशिवाय इथून केव्हां जातां येईल, याकडेच तिचें लक्ष लागलें. अंग धुतल्यावर ती सोवळें नेसूं लागली. वृंदावनाला प्रदक्षिणा घालूं लागली. मागें मागें जिथें तिथें हात जोडूं लागली. इथल्या प्रत्येक वस्तूशीं जपून वागूं लागली. थोरल्या दीराची वायको चार दिवस आजारी तर चार दिवस खडखडीत असे – चार दिवस लोळागोळा झालेली ती वाई पांचव्या दिवशीं दळणकांडण करूं लागे– वसुधेचा दीर म्हणाला, मी आहे म्हणून ती अजून जिवंत आहे. नाहींतर केव्हांच हिला खाऊन टाकली असती.

घरांतला कारभार वहुतेक मागें आलेली जाऊ वघत होती – ऐन तरुणपणीं तिला वैधव्य आलें होतें – तिनें वपन करून घेतलें होतें, आणि थक्क व्हावें, अशी व्रतस्थ रहात होती. अवाक्षरा काहीं वोलत नव्हती. चांगल्या फुलाचा वास घेत नव्हती. साध्या एकेऱ्या लुगड्यावर थंडीवाऱ्याला झोपत होती. कारणपरत्वें हंसायला आलें, तर तोंड फिरवीत होती. वसुधेला ती म्हणाली, आम्ही गेल्या जन्मींच्या पापी म्हणून मागें राहिलों. खापरपणजे सासू सती गेली–माझ्यापेक्षां सुध्दां लहान होती. पण मनाची तयारी– हं ! आतां दिवस घालवायचे—''

वसुधेला वाटायचें रोज हिच्या पायाचें तीर्थ घ्यावें.

तिचा दीर वसुधेला पुढें पुढें करत होता. या आपल्या सुरेख भावजयीवद्दल त्याला कौतुक वाटत होतें. फारसा न बोलणारा तो माणूस वसुधेशीं मोकळेपणें वोलत होता. एक दिवस ती अंग धुवून देवघरांत गंध उगाळीत होती. मोठ्या सहाणेवर तसेंच भक्कम चंदनी खोड खसाखस फिरवतांना वसुधेचे हात भरून येत होते – जवळ तिचा दीर देव खालीं काढत

होता. मध्येंच त्याने परडींतली चार सोन-चाफ्याचीं फुलें वसुधेकडे फेकलीं होतीं. वसुधेनें तीं माळलीं होतीं. आणि गंधाचें भक्कम खोड उगाळायला लागली होती– गंध तिनें तबकडीला लावलें. सहाण धुतली आणि भिंतीला टेकण्यासाठीं बाजूला केली– सहाणेच्या तळीं चाचड – होते चावऱ्या बुरशा मुंग्या – हां हां म्हणतां जमिनींतून वर येत होते – "अहो—" वसुधा एकदम ओरडली– वळतां वळतां देवघरभर चाचड झाले होते—

"बाहेर जा–" तिचा दीर म्हणाला – मग त्यानें धुपाटण्यांत धूप घातला – काहीं वेळानें त्या चावऱ्या बुरशा मुंग्या नाहीशा झाल्या होत्या – वसुधा आज पहिल्यानें देवघरांत गंध उगाळायला गेली होती – वसुधा मनांतून भ्यायली – इथली ही अदृश्य शक्ति कुठे डोळे वटारून बसली आहे तिला कळले नाहीं. – मागें आलेली जाऊ तिला मोघमपणें म्हणाली, "इथें असा पापाचा साक्षात्कार घडतो – हातून काय घडलें असेल, तर मन पहावें – "

अजून त्या चावऱ्या बुरशा मुंग्या मनांत आल्या, तरी मळमळायला होत होतें, आणि मनांत चुटपूट लागून राहिली होती–आपलें कुठें काय चुकलें तिला कळत नव्हतें. अदृश्य शक्तीनें कुठल्या पापाची नोंद केली आहे– जाणीव दिली आहे, कळत नव्हतें.

एकदां अशीच तिन्हीसांजा ती ओसरीवर येत होती. दोन्हीकडच्या खोल्यांमधून काळोख बोळ होता. ती येत होती. समोरून तिचा दीर येत होता. त्याचा धक्का लागल्यावरोवर ती केव्हढ्यांदा दचकली होती. तोच हंसत म्हणाला होता, "छेः या काळोखांत काहीं दिसत नाहीं. तूं दिवा घेतल्याशिवाय अशी फिरत जाऊं नकोस हां–शहरांतील पुष्कळ उजेडाची संवय तुला—"

तो हंसला, आणि मग तीही हंसली. ओसरीवरचें तांब्याचें मांडें तिनें घरांत नेलें. तुळशीवृंदावनापुढें निरांजन लावायला मग ती बाहेर आली. दगडांच्या लहानशा कोनाड्यांत तिनें निरांजन ठेवलें. प्रदक्षिणा करून हात जोडले आणि पायांतून वीत दीड वीत लांबीचें जिवाणुं सळसळत गेलें. ती ओरडली. दीर लगेच धावत आला. जिवाणुं केव्हांच पाळांच्या बिळांत गेलें होतें. तिच्या दीरानें हात जोडले–पुटपुटत गालावर चापटचा मारून घेतल्या. तिथलीच नखानें माती उकरून कपाळाला लावली. तिची मागें आलेली जाऊ म्हणाली, "कुठें तरी आक्रिताची जाणीव आहेः पाप घडतें आहे. आमचा गोठा उघडा आहे. वाघ या हद्दीच्या आंत येत नाहीं. पुष्कळ वर्षापूर्वी दरवडा आला होता. पूर्वीचे दरोडे म्हणजे वाजत गाजत यायचे तसाच आला होता. वृंदावनाच्या तिथें चोर आले, तिथें चोरांचे हात पाय मरगळले–पुढें पाऊलच त्यांच्यानें टाकवेना–कुठें कीड मुंगी चावत नाहीं–" उमारत ती बोलत होती. वसुधेला वाटत होतें, ती आपल्याला टोचून बोलते आहे. आपल्या हातून केव्हां कधीं पाप घडलें का ?–अशी जाणीव व्हावी; अदृश्य शक्तीनें नोंद घ्यावी, असें खरोखरच मनांत येत नव्हतें. सारख्या मुंबईच्याच आठवणी येत होत्या. अपूर्वाईची वस्तू खायला घेतली, तर घास अडकत होता. आरशापुढें उभी राहिली, स्वतःच्या रूपाबद्दलचा अभिमान दुणावत होता. नवऱ्यानें केलेल्या स्तुतीचे शब्द आठवत होते–त्याच्या सहवासाच्या आठवणीनें मन मोहरत होतें–लग्न झालेल्या स्त्रीचें हें काय पाप होतें—? कुविचार होता? इथें आल्यावर ती अशुचि वागतच नव्हती. सोवळं ओवळं कटाक्षानं पाळत होती–मग–? तिनें मनाशीं आठवून आठवून पाहिले–छेः छेः आयुष्य–तर निर्मळ गेलें होतें–एकदां लहानपणी तिच्या एका ख्रिश्चन मैत्रिणीबरोबर तिच्या घरीं गेली होती. घरांतल्या माणसांना न सांगतां न विचारतां गेली होती. घरीं विचारलें असतें, तर घरच्या माणसांनीं जावूं दिलें नसतें– हें तिला पक्कें माहित होतें. ती गेली होती.

त्या ख्रिश्चन मुलीच्या आईनें मांडलेला चहा नको कसें म्हणावें तिला कळलें नव्हतें. चहाच नव्हे, तर बिस्किटेंही तिनें खाल्लीं होतीं. ती घरी आली, नि तिला चोरट्यासारखें वाटूं लागलें. पूर्वी म्हणत अशीच माणसें बाटवीत–म्हणजे आपण बाटलोंच की ! वडिलांनी देवापुढें निरांजन आणायला सांगितलें, तेव्हां तिचा हात थरथरत होता. स्वप्नांत केव्हां तरी खरें तोंडांतून बाहेर पडेल ही धास्ती सुध्दां होती–मागचे काहीं दिवस शाळेव्यतिरिक्त तिनें घरांत बसूनच्या बसून काढले होते. श्रावणीच्या वेळीं वडिलानी घरीं आणलेलें वाटीभर पंचगव्य हळूच ती पळीभर प्यायली होती, आणि शुद्ध झाली होती—

तीच गोष्ट या अदृश्य शक्तीच्या लक्षांत आली का ? वसुधा देवघरांत गेली–समोरच्या पाटावर तिनें नाक घासलें–मनोमनीं आपल्या हातून घडलेल्या पापाची कबुली दिली–दोन चार दिवस मध्यें कसे छान जात होते, मग एखादे दिवशीं असेंच काहीं घडत होतें–चमत्कारिक. जिवाला टोचणी लागेल असें. घरांतली माणसें मोजकीं. जीं होतीं तीं इथें रूळलेलीं होतीं. पापपुण्य यांची पुरी माहिती असलेली. वसुधा संभाळून वागत होती–देवघरांत जातांना पायावर पाणी घातल्याशिवाय जात नव्हती. जें काहीं मध्यें घडत होतें, तें अमंगळ होतें, किळसवाणें वाटावें असें होतें–केव्हां केव्हां भितीग्रस्त होतें. एकदां ती सकाळीं उठली होती. तोंड धुवून ती घरांत आली होती. पातळ नीट करणें, केस सावरणें हें करायचें होतें. दीर कुठें बाहेर जायचा होता. त्याचें खाणें पिणें तयार करायचें होतें.









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





जाऊ हें करीत होती, आणि वसुधेला तिनें ताक ओढायला आधीं सांगितलें होतें – तीं आंत येतांना दीरानें तिला तुझें काय आणायचें आहे का विचारलें होतें. ती नाहीं म्हणाली होती, आणि स्वयंपाक घरांत आली होती – ताक ओढत होती. दीर बाजूला वसून न्याहारी करत होता. ताक घुसळून झालें – रवी तिनें काढली – ताकाच्या वरणीखालीं लाल मुंग्या आल्या होत्या. एक पायाला डसली होती, ती वेग देत होती – लहान मुंग्यांत डोंगळयाएवढे मुंगळे सुद्धां होते – हांहां म्हणतां दीराच्या न्याहारीच्या पत्रावळीखाली हें हुरण आलें होतें. – घास घ्यायला हात वर गेला, तर ,हाताच्या वोटांना मुंग्या डसल्या होत्या. फाटावरून वर चढून मांडीला चावायला लागल्या होत्या – दीर तसाच उठला – नारळ घेऊन तो तुळशीपुढें गेला. – दुपारीं एकही मुंगी दृप्टीला पडली नव्हती. जावेनें तिला सारखें कांहींना कांहीं विचारलें होतें – असे दृप्टांत वरच्या वर कां मिळूं लागले कळत नव्हतें. – एका रात्रीं तिचा दीर झोपेंत केवढयांदा तरी ओरडला होता – दिवा घेऊन सारीं माणसें जमा झालीं तेव्हां त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला होता.

आपाढांत वसुधेच्या सासऱ्याचें श्राद्ध होतें. वसुधेनें सोवळयाचें भरजरीचें लुगडें चापूनचोपून नेसलें होतें – नाकांत नथ घातली होती – तिच्या आजारी असलेल्या जावेनें तिला नीट चंद्रकोर लावली होती, आणि किती वेळा तिनें वसुधेकडं पाहिलें होतें. स्वतःच्या कुरूपतेबद्दल तिला जराही मत्सर वाटला नव्हता. – तिनें वसुधेच्या मुखावरून हात फिरवला होता. एक काजळ वोट वसुधेच्या गालाला लावावेसें तिला वाटलें होतें. जाणत्या बाईसारखें तिनें ब्राह्मणांना वाढलें होतें. पानें वाढल्यावर तिनें वाढलेल्या नेटक्या पदार्थाकडे पहात रहावेसें वाटत होतें – तिला श्राद्धपक्षाला वाढायची संवय नव्हती. – तरी तिनें समजून घेऊन वाढलें होतें. –

– कांहींशी अवेळीं घरांतल्या बायकांचीं जेवणें झालीं. दीरानें तिचें तोंड फाटेपर्यंत कौतुक केलें होतें – दुपारीं सारें आटोपलें तेव्हां चांगली संध्याकाळच झाली होती. तरी दमलेल्या बायका जरा लवंडल्या होत्या. जेवणाची सुस्ती डोळयावर आली होती. एवढयांत तिची आजारी जाऊ ताडकन् उठली होती – कोणी तरी तिला जोरानें ऊठ ऊठ म्हटलें होतें – वाकीच्या बायका अर्धवट जाग्या होत्या – झाला होता तो आभासच – पण अगदीं स्पष्ट जाणवला होता. सगळयांचीं मनें बावचळल्यासारखीं झालीं होतीं. कोणाच्याही हातानें घडो – कांहीं तरी अशुचि घडत होतें – पोराबाळांनीं कानावर हात ठेवले होते. वसुधेनें दुपारी आरशांत बघितलें, नथ सारखी केली, तेव्हां तिला नवऱ्याची आठवण झाली होती – यापेक्षां आणखी कांहीं नव्हतें. श्रद्धा ठेवूनच तिनें वाढलें होतें. आणि पिंडांना नमस्कार केला होता – वसुधेला वाटत होते, साऱ्यांना संशय आपलाच आहे – आतांच्या ह्या शहरी मुलींबद्दल एकदम तसा कोणाचा विश्वास नाहीं – असें कांहीं घडलें, कीं पाठी असलेली जाऊ तिलाच विचारत होती – चुकलें माकलें वृंदावनाजवळ कबूल करून ये म्हणत होती – यापेक्षां घरीं आणखी कसला जाच असता, तर परवडलें असतें – श्रीमंती कमी असती तरी चाललें असतें – चौसोपी घरापेक्षां लहानसें घर चाललें असतें. कांहीं चुकलें असलें, तर सरळ कळून एक मुस्कटांत कोणी मारली असती तरी वेदना सलत राहिल्या नसत्या–

घरांत मंगळागौरीची तयारी चालली होती – मोदकांकरतां तांदूळ दळून झाले होते – पण प्रत्येकाचें मन धापावलेलें दिसत होतें – कोणी मोकळेपणी बोलत नव्हतें–या जाणिवेंतून काहींतरी दुश्चिन्ह सूचित आहेसें वाटत होतें-मंगळागौरीचा घातलेला वेत नीटपणी पार पडेल की नाहीं, याबद्दल प्रत्येकाचें मन सांशक होतें–

एवढया मोठया घराची आंघोळीची जागा उघडयावर होती. घरांतलीं बाकीचीं माणसें निःसंकोचपणें अंग धूत होती. समोर गडी माणसें फिरत असली तरी त्याचें कोणाला कांहीं वाटत नव्हतें, वसुधेली अशी संवय नव्हती. ओलें वस्त्र तिथेंच सोडणें कठीण वाटत होतें–त्या दिवशीं ती अशीच अंग धूत होती–तिचा दीर तिथेंच काहीं करत होता. ती बाजूला झाली, की त्याला आंघोळ करायची होती–न्हाणी करतां डाळलेल्या जळवणाखालीं सरसरलें–तिनें त्याकडे बघितलें. केव्हढा मोठा साप संथपणे जात होता–त्याच्या तोंडावरचा दहाचा आकडा–त्याचें चकचकीत अंग–वसुधेची बोबडी वळायची वेळ आली–लपेटलेल्या वस्त्रानें ती धावत घरांत आली–बोलण्याकरतां तिच्या तोंडांतून शब्द फुटत नव्हता--

तिच्या दीरानें वृंदावनापुढें नारळ ठेवला. देवापुढें धूप घातला — वसुधेला पुन्हा पुन्हा डोळयापुढें तो साप दिसत होता — त्याचें रूप आठवलें, कीं अंगावर काटा उभा रहात होता. छाती धपापत होती — घशाला कोरड पडत होती — तिची जाऊ म्हणाली होती, इथल्या आराप्टकांत कुठें सरडा सुद्धां उगाच दृष्टीला पडत नाहीं —

मग हें चाललें होतें तरी काय ? — बाकीचीं माणसें निष्पाप वाटत होतीं — इथल्या दगडधोंडयाचा त्यांना परीचय होता — पाप आणि पुण्य हा भेद पावला-पावलाला त्यांना कळत होता — वसुधेला वाटत होते, आपलेंच अदृश्य पाप कुठे तरी अदृश्य शक्ति नोंद घेतें आहे —

कुठलें एवढें पाप ? — तिला साप दिसला, त्याच्या आदल्या दिवशीं ती शेतावर फिरायला गेली होती — पाऊस संथावला होता. शेतीभातीनें जीव धरला होता–हिरव्यागार मोकळया डुलायला लागणाऱ्या शेताकडें पाहून तहानभूक हरपत होती. स्वच्छ पाण्याचा पाट वहात होता – शेत मोकळयावर होतें — चारी बाजूला आकाशाच्या कडा विसावलेल्या दिसत होत्या. एवढयांत उन्हाची तिरीप आली होती — पूर्वेकडे काळया ढगावर इंद्रधनुष्याची महीरप चढली होती — सप्तरंग उधळले होते — कुणा अद्वितीय कलावंतानें कुंचला घेऊन रेषा ओढल्या होत्या — काळया चमकत्या पार्श्वभूमीवर बाकीचे रंग कसे नेटके बसले होते — खालचा

अनुक्रमणिका

रानफुलांचा गालिचा, वैरचें हें वेधक दृश्य–पश्चिमेकडून काळ्या ढगांची एकेक रांग वर येत होती... नुकतं कुठं रविबिंब बाहेर येऊं पहात होतं, तें थोड्याच वेळांत झांकाळून जाणार होतं — क्षितिजापर्यंत सारें सपाट होतें — हिरवें शेत, लय घेत उभें होतें — दूरवर एक आंब्याचें, किंवा सातवणाचें झाड डेरेदार उभें होतें — नुसत्या आभाळाच्या पार्श्वभूमीवर तें एकटें झाड रेखीव दिसत होतें — वसुधेला आठवण झाली — कसल्यातरी दोन मुलायम ओळी ओठावर आल्या — अशोक आठवला. मागें तिच्या आजोळीं ती असतांना त्याची गांठ पडली होती. ओळख झाली होती. मावशीच्या मुलांवरोवर माळरानावर ती फिरायला गेली होती — अशोकही वरोबर होता — अशीच पाठीं आभाळाची पार्श्वभूमि होती – वाऱ्याच्या झुळकीनें त्याचे केस भुरभुरत होते – त्याचा चेहरा हळवा होता – लोभस होता – डोळे निळे होते — तो उभा होता — असतां असतां त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर पडत होते — शब्द गोड होते — कानांत सांठून रहात होते — त्याची कविता तिथल्या तिथें तयार झाली होती — आजोळाहून वसुधा घरीं आली, त्याला वरींच वर्षं होऊन गेलींत — ओळी अजून लक्षांत होत्या — वाऱ्याच्या झुळकेवर भुरभुरणारे केस आठवत होते — तो पुढें कुठें होता कळलें नाहीं — त्या दिवशीं तिला तीच आठवण झाली होती — त्याच्या कवितेचे शब्द ओठावर आले होते — आणि खरंच वसुधेला वाटूं लागलं — कितीही निर्मळ मनानं त्याची आठवण काढली, तर लग्न झालेल्या मुलीनं परपुरुषाची आठवण होऊं देणं हें खचितच पाप आहे — पाप आहे – त्या अदृश्य शक्तीनं सर्पाच्या रूपानं या पापाची आठवण करून दिली असेल — या घरांत तसें खपणार नाहीं — इथल्या वास्तूनं जोपासलेली एक सती गेली — ऐन तारुण्यात पुढें विकल्प नको म्हणून सती गेली – मन शुद्ध राखण्यासाठीं ती चितेवर जिवंतपणीं बिनधोकपणी चढली — ही झाली जुनी गोष्ट. तिची मधली जाऊ काहीं म्हातारी झालेली नव्हती. अजून तिचा बांधा गोंडस होता. अंगकांति हळदीसारखी होती. कपाळावर हिरवा चंद्र होता. हनुवटीवर, गालावर गहूं कोरलेला होता — शिवलीलामृत वाचूं लागली, तर ऐकत रहावें, असा आवाज होता — पण तिनें हें असें जगणें पत्करलें होतें —

रोज काहीना काहीं घडत होतें — एकदां रात्रीं जेवतांना तिच्या दीराच्या पानांत पाल पडली होती — भुकेल्या जीवाला उठून जावें लागलें होतें. त्याच्याजवळ म्हणे मंत्र होता — तो त्याला पाळावा लागत होता. जेवतांना कोणी आवाज केला, सर्पाचें नांव घेतलें, रहाट वाजला, अभद्र बोललें, तर त्याला उठावें लागत होतें. मग सबंध दिवस उपाशी रहावें लागत होते —

"घरांत काहींतरी चमत्कारिक घडतें आहे — भ्रष्टाकार होतो आहे — पाप उचल खातें आहे —" तिच्या जावेनें पुन्हा उजळणी केली —

—मंगळागौर जवळ येत चालली होती. तयारी होत होती, पण प्रत्येकाचें मन सांशक होतें — वसुधा तर जपत होती — सारखी देवाचें नांव घेत होती — असें काहीं झालें, की तिला जेवण जात नव्हतें, झोप येत नव्हती. नवऱ्याला तिनें काहींच कळवलें नव्हतें — मनांतून ती अगदीं भिऊन गेली होती. आपल्या हातून काय पाप घडतें, हें तिला कळतें, तर त्याच्या प्रायश्चित्ताकरतां काहीं करायची तिची तयारी होत होती. हें घर तिचें होतें — या वास्तुबद्दल आदर, आणि भीति वाटत होती — ती एकटी पापी राहून चालणार नव्हतें. ती इथून गेली, तरी पापाच्या खुणा इथें उमटत राहिल्या असत्या —

—मुसळधार सरीनें पाऊस पडून गेला होता. दारांतली विहीर हातानें पाणी काढावें, अशी भरली होती — सकाळपासून पाऊस थोडथोडा पडत होता. पागोळ्या त्यानें थांबवल्या नव्हत्या — वसुधा अंग धूत होती. ओलेत्यानी कळशी भरून आणायला जावेनें सांगितलें होतें — पावसांतूनच ती बाहेर पडली. अशा ओल्या अंगानें अपुऱ्या वस्त्रानें बाहेर पडण्याची तिला संवय नव्हती. न्हाणी–खालीं तिचा दीर जळवण घालत होता — वसुधेला केव्हां एकदां घरांत जाईनसें झालें होतें —

कळशी रहाटाला न लावतां ती विहिरींतच वाकली — एवढ्यांत फोंसकन् आवाज झाला — त्या दिवशींसारखा साप दोणीवरून सरपटत होता — वसुधा अशी भ्यायली कीं तिचा तोल गेला —

तिला वर काढली गेली, तेव्हां तिचं कलेवर उरलं होतं — तिच्या अपुऱ्या वस्त्रांतून तिचं उघडं अंग पहातांना तिच्या दीराची आसुसलेली नजर भरत होती — त्याच्या वासनेला हा नाहक बळी गेला होता — ●●●


अहो, रंग भिंतीला लावतां कीं तुम्हांला स्वताला लावतां ?







अनुक्रमणिका




**भारताचे माजी पंतप्रधान, थोर सुपुत्र, विश्वशांतीचे महान प्रवक्ते, भारतीय जनतेचे एक लाडके नेते पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या सामाजिक, राजकीय आणि जागतिक कामगिरीचा आणि आपला चांगलाच परिचय आहे. स्वातंत्र्यपूर्व काळांत व स्वातंत्र्योत्तर काळांत पंडितजी सतत आपल्याबरोबर होते. आणि आपण सारे त्यांच्याबरोबर होतों. पण लोकनेता, राज्यकर्ता ह्या भूमिका वटवीत असतांनाहि पंडितजी होते अखेर एक माणूस! तुमच्या आमच्या सारखेच रागावणारे, रुसणारे, संतापणारे, हंसणारे, नाचणारे, सुखदुःखांशीं झगडत झगडत जीवन पुढें नेणारे एक 'गृहस्थ' होते. तुमच्याच सारखी स्वप्नेंही पहात होते. त्यांना मुलें आणि फुलें प्रिय होतीं. कारण ह्या दोन गोष्टी माणसाला 'चिरनव' ठेवूं शकतात ह्याची त्यांना जाणीव होती. 'चिरनव' नेहरू लौकिकदृष्ट्या वृद्ध झाले आणि अखेर मृत्यु पावले.**

**पण संपन्न 'व्यक्तित्वा'चे नेहरू नेहमींच 'अमर' राहतील. त्यांच्याच शब्दांत 'ते कसे घडले--घडत गेले' हें वाचा. व्यक्तित्वाचे कांहीं अपरिचित पैलू सोबतच्या प्रसंगांतून दिसतील-चरित्र मोठें व चारित्र्यही मोठें-- ही केवळ त्याची एक झलक !**

## एक पेन घेऊं या कीं—

**लहानपणची** एक गोष्ट मला अजूनही आठवते. वडिलांचा संतापी स्वभाव होता. आणि त्या संतापाचा मी वळी झालों असा तो प्रसंग ! मी त्यावेळीं साधारणपणें पांच सहा वर्षांचा असेन. एकदां मला वडिलांच्या टेवलावर दोन फाऊंटन पेनें दिसलीं. आणि मला त्यांच्याविषयीं मोह वाटूं लागला. मी मनाशीं समजूत अशी करून घेतली कीं, वडिलांना एका वेळीं कांहीं हीं दोन्हीं पेनें लागण्याची शक्यता नाहीं. आणि अशा विचारानें त्यांतील एक मी हस्तगत केलें. नंतर मला कळलें कीं, त्या हरवलेल्या पेनसंबंधीं कसून तपास चालू आहे. त्यामुळें माझ्या हातून घडलेल्या गोष्टीवद्दल मी अतिशय भयभीत झालों. परंतु मला कवुली देण्याचें धैर्य कांहीं झालें नाहीं. परंतु अखेर पेन माझ्याजवळ सांपडलें आणि माझी गुन्हेगारी जगजाहीर झाली. वडील अतिशय संतापले आणि त्यांनीं मला वेदम मार दिला. भयानक मारानें माझ्यापुढें अंधारी आली आणि आपल्या हातून घडलेल्या गोष्टीवद्दल मनाला अतिशय लाजही वाटली. मी धांवत आईकडे गेलों. त्यानंतर कितीतरी दिवसपर्यंत विविध प्रकारचे क्रीम्स् व मलम माझ्या दुखऱ्या व लहानशा शरीराला लावण्यांत येत होते.

## हिमालयाची यात्रा—

इ. स. १९१६ त दिल्ली मुक्कामीं माझें लग्न झालें. तो दिवस 'वसंत पंचमी'चा होता. वसंत पंचमी म्हणजे भारतांतील वसंतागमनाची सूचना देणारा दिवस! त्या उन्हाळ्याचे कांहीं महिने आम्हीं काश्मीरमध्यें घालविले. त्यानंतर मी कुटुंबियांना काश्मीर व्हॅलींतच सोडलें आणि माझ्या एका पुतण्याला घेऊन त्या डोंगराळ मुलुखांत कांहीं आठवडे भरपूर भटकलों — अगदीं थेट लडाखच्या रस्त्यापर्यंत !

अतिशय चिंचोळ्या व निर्मनुष्य अशा दऱ्याडोंगरांतून हिंडण्याचा माझा तो पहिलाच अनुभव होता. एवढ्या उंचीवर मी प्रथमच गेलों होतों. "जोझी-ला" खिंडीच्या शिखरावर आम्ही पोंहचलों तेव्हां एका बाजूला मोठमोठ्या हिरव्यागार पर्वतांच्या रांगा खालीं पसरत गेलेल्या आम्हांला दिसल्या तर दुसऱ्या वाजूला मोठा नंगा खडक दिसला. आम्ही सारखे वरवरच जात राहिलों. वाट अतिशय अरुंद अशी होती. आणि मागें पर्वतांच्या रांगाच रांगा

—प्रभाकर अत्रे

होत्या. त्या पर्वतांचीं शिखरें हिमाच्छादित होतीं; आणि वर्फाच्या लहान लहान नद्या जणुं आमच्या भेटीला धांवतच येत आहेत असा भास आम्हांला होत होता. थंडगार वारा सुटला होता. अंगाला झोंवत होता. परंतु दुपारची वेळ असूनही सूर्यप्रकाशाची झळ मात्र जाणवत नव्हती. आणि हवा अशी स्वच्छ पडली होती कीं, वस्तूवस्तूंतील अंतरासंवधीं आम्ही वारंवार गोंधळांत पडत होतों. आहे त्यापेक्षां तीं तीं ठिकाणें जास्त जवळ आहेत असें वाटत होते. हळुहळू आमचें एकाकीपण वाढत गेलें. वृक्षराजी वा अन्य कुठल्याच प्रकारची वनश्री आम्हांला सोवत करायला नव्हती. मोठमोठे खडक, बर्फ आणि क्वचित प्रसंगीं कांहीं आकर्षक फुलें यांचीच काय ती सोबत आम्हांला होती. आणि तरी सुद्धां निसर्गाच्या त्या ओसाड आणि एकाकी अशा भारावून टाकणाऱ्या सामर्थ्याचा प्रत्यय घेत असतांना मला एक आगळेंच समाधान प्राप्त झालें. मला भरपूर उत्साह प्राप्त झाला आणि एक प्रकारची मोठेपणाची भावना मनांत जागृत झाली








ह्या माझ्या हिमालय भेटींत मला एक थरारक असा अनुभव आला. "**जोझी-ला**" खिंडीच्या पलिकडे जेव्हां आम्ही आगेकूच केली— त्या भागाला '**मटायन**' असें म्हणतात— तेव्हां आम्हांला असें सांगण्यांत आलें कीं, अमरनाथची गुंफा येथून फक्त आठच मैलांवर आहे. अमरनाथच्या त्या गुंफेला जाण्यापूर्वी संपूर्ण बर्फानें आच्छादिला गेलेला एक प्रचंड पर्वत चढून जाणें भाग होतें. पण त्याची क्षिती कुणाला ? आठ मैलांचें तें अंतर कांहीं फारसें मोठें नव्हतें. आम्ही उत्साहाच्या आणि अनुभवाच्या भरांत तो प्रयत्न करण्याचा निश्चय केला. त्या कृतनिश्चयानें आम्ही निघालों. आमचा कँप त्यावेळीं ११५०० फूट उंचीवर होता. आम्ही थोडीशीं माणसें बरोबर घेतलीं आणि पर्वतारोहणास सुरुवात केली. स्थानिक मेंढपाळाला आम्ही वाटाड्या म्हणून बरोबर घेतलें.

आम्ही कितीतरी बर्फाच्या नद्या ओलांडल्या आणि वर चढून गेलों. आणि मग आमचा त्रास वाढला. श्वासोश्वास घेणेंही हळूंहळूं त्रासदायक होऊं लागलें. आमच्यांपैकीं ज्या हमालांच्या जवळ कमी सामान होतें ते सहाय्य करीत होते. नंतर बर्फ पडूं लागलें आणि त्यामुळें बर्फाच्या नद्या भरून गेल्या. पाय घसरूं लागले. आम्ही भयंकर दमलों आणि प्रत्येक पाऊल उचलणें कष्टप्रद वाटूं लागलें. त्यासाठीं खास परिश्रम घेण्याची गरज जाणवूं लागली. तरीही आम्ही आमचा वेडगळपणाचा प्रयत्न चालूंच ठेवला. आम्ही आमचा तळ पहांटे चारला सोडला आणि बारा तासांच्या सतत पर्वतारोहणानंतर आम्हांला एक भलें मोठें बर्फाच्छादित शेत दिसलें. तें दृश्य मोठें उत्तेजक व सुंदर होतें. भोंवतीं बर्फाच्छादित शिखरें दिसत होतीं ! तीं जणुं मुकुटासारखींच दिसत होतीं. जणुं परमेश्वराच्या नाट्यगृहांतील एकादी गॅलरीच भासत होती. परंतु सतत होणारा हिमवर्षाव आणि धुकें यांमुळें तें दृश्य अधुनमधून आम्हांला पारखें होत होतें. आम्ही नेमक्या किती उंचीवर पोंहचलों होतों तें सांगतां येत नसलें तरी माझा अंदाज असा आहे कीं, आम्ही १५००० ते १६००० फूट उंचीवर जाऊन पोंहचलो होतों. अमरनाथच्या गुंफेच्या आम्ही वरच जाऊन पोंहचलो होतों. आतां आम्हांला फक्त तें बर्फाचें शेत ओलांडून पलिकडे जायचें होतें. तें अंतर साधारणपणें अर्धा–एक मैलाचें असेल. तें ओलांडले कीं आम्ही गुंफेच्या दुसऱ्या बाजूला पोंहचणार होतों. आम्हांला असें वाटलें कीं, डोंगर चढणें आतां संपलें असल्यानें महत्त्वाच्या अशा सर्व अडचणी आम्ही आतां पार केल्या आहेत. त्यामुळें थकलों भागलों होतों तरी हंसत खेळत मजेनें आम्ही पुढील प्रवासास सुरुवात केली. हा पुढला प्रवास युक्ति प्रयुक्तीनें करणें आवश्यक होतें. कारण बर्फांत ठिकठिकाणीं मोठमोठ्या भेगा पडलेल्या होत्या. आणि नवीन हिमवर्षावामुळें धोक्याच्या जागा नेमक्या झांकल्या जात होत्या. ह्या नवीन हिमवर्षावानें माझी उमेद खचून टाकली. त्यावर मी पाऊल ठेवलें मात्र, पायाखालचें बर्फ निसटलें आणि मी बर्फाच्या एका मोठ्या, जणुं आ वासूनच उभ्या असलेल्या खड्ड्यांत पडलों. तो खड्डा फार अरुंद होता आणि त्यांत कांहींही गाडलें जाणें शक्य होतें. त्या गाडल्या गेलेल्या वस्तूचें भूगर्भ शास्त्र संशोधनाला सहाय्य देण्याइतपत त्या



# नाटक इथें जन्मलें !

**"शारदा"** हें मराठी रंगभूमीवर आलेलें पहिलें सामाजिक नाटक. या नाटकाची रचना देवलांनीं स्वतंत्र रीतीनें रचलेली. त्यांचीं गाजलेलीं इतर नाटकें संस्कृत वा इंग्रजी कथानकावर आधारित. शारदा नाटकांतील बालवृद्ध विवाहाच्या कठोर दर्शनानें प्रेक्षकांच्या अन्तःकरणास फार मोठा धक्का बसला. स्त्रियांच्या परावलंबी असहाय्य जीवनाची जाणीव झाली, खळबळ होऊन जागृति आली. म्हातारा नवरा लहान वयाच्या वधूशीं लग्न करूं लागला तर त्याची आणि कन्या अर्पण करणाऱ्या मुलीच्या बापाची उघडपणानें निंदा होऊं लागली.

सांगलीपासून तीन-साडेतीन मैलांवर कृष्णा वेण्या या नद्यांचा संगम झाला आहे. संगमाच्या कांठावर हरीपूर हें एक छोटेसें टुमदार गांव आहे. 'संगमनाथ' म्हणून ओळखलें जाणारें एक भव्य पुरातन दगडी मंदिर नदीच्या कांठावर असून त्या देवळाच्या बाहेर जवळच घाटाजवळ एक विस्तीर्ण असा पिंपळ आणि त्या सभोंवतीं बांधलेला असा एक दगडी पार आहे. देवल हरीपूरला रहात असतांना मित्रांच्या समवेत फिरावयास आल्यावर या दगडी पारावर बसून गप्पाटप्पा ठोकीत बसण्याचा त्याचा सायंकाळचा नित्यक्रम असे. त्यांच्या गप्पा चालूं असतांना एके दिवशीं एक वृद्ध गृहस्थ तिथें आला. गांवामधील एका लोभी माणसानें खूप पैसा घेण्याचें ठरवून आपली लहान वयाची मुलगी एका म्हाताऱ्यास देऊं केल्याची बातमी त्यानें दिली. ही हकीकत ऐकल्यावर देवलांच्या कलासक्त हळुवार मनास जखम झाली. बराच वेळ ते गप्प बसून राहिले. त्या अजाण मुलीच्या असहाय्य परिस्थितीचें करुण चित्र त्यांच्या डोळ्यासमोर येऊन अन्तःकरणास यातना होऊं लागल्या. नाटकाचा आराखडा साकार होऊं लागला. जनता जनार्दनाच्या वेशीवर त्या अश्राप मुलीचें दुःख त्यांनीं इतक्या आत्मविश्वासानें आणि प्रभावीपणानें मांडलें कीं प्रेक्षकांना त्याचा जबर धक्का बसला. शारदा हें पहिलें सामाजिक नाटक. मराठी रंगभूमीवर सामाजिक नाटकांचें नवें पर्व यानंतर सुरू झालें.

देवलांचें गाजलेलें लोकप्रिय झालेलें "शारदा" नाटक ह्या इथें जन्मलें !

('मराठी रंगभूमि' या आगामी चित्रपटांतील चित्रसंग्रहामधून श्री. के. टी. देशमुख यांच्या सहकार्यानें).







भेगेची–त्या खड्डयाची क्षमता होती. परंतु दोराचा आधार घेऊन मी त्या खडयांतून बाहेर आलों. ह्या अनुभवानें आम्ही कांहींसे हललो होतो. तरीही आणि पुढें जाण्याचा हट्ट सोडला नाहीं. परंतु वर्फातल्या भेगा इतक्या मोठमोठ्या लागल्या. त्यांची संख्याहीं वाढली आणि त्या ओलांडून पलिकडे जाण्याचें कांहींच साधन आमच्याजवळ नव्हतें. त्यामुळें अखेरीस आम्हीं परत फिरलों. थकले भागलेले, निराश झालेले असे आम्हीं परत फिरलों. अमरनाथच्या गुंफेचें दर्शन आम्हांला घडलेंच नाहीं.

काश्मीरमधील उंच उंच असे डोंगर आणि मोठमोठ्या दऱ्या यांचें मला इतकें आकर्षण वाटूं लागले होतें कीं, मी परत तेथें येण्याचा मनोमन निश्चय केला. पुष्कळ योजना आंखल्या, सहलीचा कार्यक्रम आंखला. हा आंखत असतांना एका विचारानें मला पार भारून टाकलें होतें. तो विचार म्हणजे तिबेटांतील मानस सरोवराला व जवळच्या हिमाच्छादित कैलासाला भेट हा होय. अठरा वर्षांपूर्वी मी हा निश्चय केला होता. परंतु आजही मी मानस सरोवर आणि कैलास यांजपासून कितीतरी योजनें दूर आहे. मला पुन्हां काश्मीरलाही भेट देतां आली नाहीं. वास्तविक मला सतत त्याची खंत वाटत आली आहे. परंतु दिवसेंदिवस मी राजकारण आणि सार्वजनिक चळवळींत इतका गुंतत गेलो कीं माझी भटकण्याची भूक मला तुरुंगांत जाऊन वारंवार भागवावी लागते. परंतु अजूनही मी योजना बांधतो. कारण तो माझा आनंद हिरावून घेण्याचें सामर्थ्य तुरुंगांतहीं नाहीं. आणि तुरुंगांतही अन्य कोणी तो आनंद हिरावून घेऊं शकणार नाहीं आणि तुरुंगांत माणूस यापेक्षां वेगळें काय करणार ? अजूनही मी हिमालयांत भटकतो आहे. शिखरें ओलांडून मी त्या सरोवराप्रत पोंहचलो आहे. माझ्या मनांतल्या शिखराचें (कैलासाचें) दर्शनही मला झालें आहे. अशीं स्वप्नें पाहतों. परंतु जीवनाचा प्रवाह मात्र वाहतो आहे. पायाखालची वाळू घसरते आहे. तारुण्य सरून मध्यम वयाला प्रारंभ होतो आहे. आणि त्या वयांतून कदाचित् कांहींतरी भयानक वाईट घडेल. कधीं तर वाटते कीं, कदाचित मी इतका म्हातारा होईन कीं कैलास आणि मानस सरोवरापर्यंत मी कधींच पोहचणार नाहीं. ह्या प्रवासाचा शेवट कधींही दृष्टिपथांत आला नाहीं तरी हा प्रवास करून पाहण्यासारखा आहे. अशी माझी श्रद्धा आहे.

> Yea, in my mind these mountains rise,
> Their perils dyed with evening's rose;
> And still my ghost sits at my eyes,
> And thirsts for their untroubled snows.
>
> —**Walter de la Mare.**

## नगरपालिकेंत नेहरू–

वर्ष दोन वर्षे नगरपालिकेंत काम केल्यानंतर मला अशी जाणीव झाली कीं, माझ्या शक्तीचा उपयोग योग्य दिशेनें होत नाहीं. त्याचा योग्य तो फायदा होत नाहींसे मला जाणवलें. कामाची गति वाढविणें आणि अधिक चोख रीतीनें कांहीं कामें घडवून आणणें एवढेंच मला करतां आलें. यापेक्षां कांहीं मूलगामी स्वरूपाचे बदल मला त्या कार्यांत घडवून आणतां आले नाहींत. मला अध्यक्षपदाचा राजिनामा द्यावा असें वाटत होतें. पण सभासदांनीं मला राहण्याचा आग्रह केला. त्यांच्याकडून मला सतत प्रेमळ वागणूकच मिळाली. सोहार्द्रच मिळालें. त्यामुळें त्या विनंतीचा मला इन्कार करतां आला नाहीं. परंतु दुसऱ्या वर्षाची मुदत संपल्यावर मात्र मी अध्यक्षपदाचा राजिनामा दिला.

हीं १९२५ सालची गोष्ट आहे. हिवाळयांत माझ्या पत्नीची प्रकृति अतिशय बिघडली. कितीतरी महिने ती लखनौच्या दवाखान्यांत पडून होती. कांग्रेसचें अधिवेशन त्यावर्षी लखनौला भरलें. आणि कांहींशा गोंधळलेल्या मनस्थितींत मी अलाहाबाद, लखनौ आणि कानपूर यांच्या दरम्यान चकरा टाकीत राहिलों. (अजूनही मी कांग्रेसचा जनरल सेक्रेटरी होतों.)

पुढें स्वित्झरलंडमध्यें जाऊन उपचार घेण्यासंबंधींची सूचना माझ्या पत्नीच्या संबंधांत करण्यांत आली. मी त्या सूचनेचें स्वागत केलें. कारण हिंदुस्थानच्या बाहेर जाण्यासाठीं मी कांहींतरी सबब शोधीत होतो. माझें मनापुढें एक प्रकारचें धुकें पसरलें होतें. आणि त्यामुळेंच मला निश्चित असा मार्ग दिसत नव्हता. त्यामुळें मला असें वाटलें कीं, हिंदुस्थानपासून कांहीं काळ दूर गेलो तर मला कदाचित सर्व गोष्टी चांगल्या स्वरूपांत दिसतील आणि माझ्या मनांतील अंधःकार नाहींसा होऊन मला प्रकाश दिसेल.

१९२६ च्या मार्च महिन्याचे आरंभी मी, माझी पत्नी आणि कन्या मुंबईहून व्हेनिसला जाण्यासाठीं बोटीनें निघालों. त्याच बोटीनें माझी बहीण व मेव्हणे रणजित एस्. पंडित हेही निघाले. आमच्या निघण्याचा प्रश्न पुढें येण्यापूर्वी कितीतरी दिवस त्यांनीं त्यांची युरोपची सफर निश्चित केली होती.

## भगतसिंग आणि नेहरू–

लाहोर खटल्यांतील आरोपींनीं सुरू केलेल्या अन्नसत्याग्रहाला महिना झाला. त्यावेळीं मी लाहोरला होतों. त्या अन्नसत्याग्रह्यांपैकीं कांहींना तुरुंगांत जाऊन भेटण्याची मला परवानगी मिळाली. आणि तिचा मी फायदा घेतला. भगतसिंग, जतींद्र दास व अन्य मंडळींना मी प्रथमच पाहिलें. ते सर्वजण अतिशय अशक्त झाले होते आणि अंथरुणाला खिळून राहिले होते. त्यांच्याशीं अधिक काळ बोलत राहणें ही गोष्ट सर्वस्वी अशक्य होती. भगतसिंगाजवळ अत्यंत आकर्षक व तरतरित चेहरा लाभलेला होता. अतिशय शांत आणि धिम्मी अशी त्याची वृत्ति दिसली. त्याच्या चेहऱ्यावर कुठेंहीं संतापाची छटा नव्हती. तो अतिशय शांत होता आणि अतिशय शांतपणें बोलत होता. मला तर असें वाटतें कीं, एक महिनाभर उपवास करणाऱ्या कुणाहीं माणसाच्या चेहऱ्यावर ही शांति आणि एक प्रकारचें आध्यात्मिक तेज प्राप्त होत असावें. जतीन्द्र दास तर फारच गरीब, मवाळ वाटत होता. एखाद्या तरुण मुलीसारखा कोमल आणि शांत वाटत होता. मी ज्यावेळीं त्याला भेटायला गेलो तेव्हां त्याची प्रकृति खूपच ढासळली होती. वेदना खूप वाढल्या होत्या. पुढें तो ६१ व्या दिवशीं अन्नसत्याग्रहांतच मृत्यु पावला.

भगतसिंगाची महत्त्वाची अशी इच्छा होती कीं, त्याचा चुलता सरदार अजितसिंग यांना भेटावें किंवा निदान त्यांच्या संबंधीचें कांहींतरी वृत्त कानीं पडावें. सरदार अजितसिंगांना १९०७ सालीं लाला लजपतराय यांजबरोबर हद्दपार करण्यांत आले होते. पुष्कळ वर्षे ते परदेशांत अज्ञातवासांत होते– उडत उडत अशी बातमी होती कीं, ते दक्षिण अमेरिकेंत स्थायिक झाले आहेत. परंतु त्यांची कांहीं निश्चित वार्ता आहे असें मला वाटत नाहीं. ते जिवंत आहेत कीं दिवंगत झाले आहेत हेंही मला ठाऊक नाहीं. ●●●



# रो झॅ ली आणि ट्रि क्सी


-माधव जोशी

लंडन


***'मी त्या अंध टाईपिस्ट मुलीला २५ ओळींचा मजकूर सांगितला. तिनें ४५ सेकंदांत टाईप केलेल्या मजकुराचा कागद माझ्या हातांत दिला आणि तिची मैत्रिण ती ट्रिक्सी (कुत्री), तीही अजबच...........***

—**"अरेच्या** ! तुझ्या ऑफिसमध्यें कुत्रीं-पण आहेत वाटतें ?" माझ्या हातांत माझ्या मित्राला आलेलें 'अभिनंदन-कार्ड' होतें. त्यावर पुष्कळ मित्र-मैत्रिणींच्या सह्या होत्या. एका सहीशेजारीं कुत्र्याचा पंजा अगदी व्यवस्थितरीत्या उठविलेला होता. त्याकडे पहात 'मी हंसत हंसत त्याला वरील प्रश्न विचारला.

"तो आमच्या ट्रिक्सीचा पंजा." जरासा ओशाळल्यागत होऊन तो म्हणाला, "आमच्या ऑफिसमध्यें रोझॅली नांवाची एक स्टेनो–सेक्रेटरी आहे. तिची ती कुत्री."

माझें एवढ्यानें समाधान होण्यासारखें नव्हतें. इकडे कुत्रीं-मांजरें इत्यादींचें फारच प्रस्थ आहे. हे प्राणी पाळणाऱ्यांच्या संस्था आहेत, मासिकें आहेत, त्यांच्यासाठीं निराळीं दुकानें आहेत. त्यांचे कपडे, स्वेटर्स सर्व कांहीं विकत मिळतें. पोलिसांमधील कुत्र्यांना तर त्यांच्या बरोबरीनें पगार मिळतो. बढती, फिता, सर्व कांहीं मिळतें. कुत्र्यांना शिक्षण देणाऱ्या संस्थाहि आहेत. हें सर्व माहीत असूनहि मी परत विचारलें– "पण तिच्या ठश्याचें कारण ?"

"कारण, रोझॅली ही एक अंध मुलगी आहे. आणि ट्रिक्सी तिची 'गाईड' म्हणून काम करते. तिला बरोबर ऑफिसमधें घेऊन येणें, रस्ता क्रॉस करण्यास मदत करणें आणि परत घरीं नेऊन सोडणें इत्यादि सर्व कामें ही कुत्री करते. आणि म्हणूनच ट्रिक्सीनें सही (?) केल्याशिवाय रोझॅली सही करीत नाही."

माझें कुतूहल जागृत झालें, आणि ह्या जोडगोळीचा आणखी परिचय करून घ्यावयाच्या उद्देशानें जरूर ती परवानगी घेण्यासाठीं पत्ता, फोन नंबर इत्यादि माहिती लिहून घेऊन मी माझ्या मित्राचा निरोप घेतला.

* * *

"मि. ओलीन हे बाहेर गेलेले आहेत. मी आपणांस कांहीं मदत करूं शकतें कां?" मला फोनवर उत्तर मिळालें.

"माझें नांव मि. जोशी, मला त्यांच्या सेक्रेटरीचा परिचय करून घ्यावयाचा आहे, आणि त्यासाठीं मला त्यांची परवानगी पाहिजे आहे."

अगदीं मनापासून हंसल्याचा आवाज ऐकूं आला आणि मला निमंत्रण मिळालें–"मि. जोशी, आपण गुरुवारीं सकाळीं ९॥ वाजतां इथें या, तुमची आणि रोझॅलीनची नक्की भेट होऊं शकेल, त्यासाठीं श्री. ओलीन यांच्या परवानगीची कांहीं आवश्यकता नाहीं. ते फार फार चांगले गृहस्थ आहेत."

"माझें काम केल्याबद्दल आपला आभारी आहे, मी ठरलेल्या वेळीं नक्की येतों. अरे पण हो ! मी कुणाशीं बोलतों आहे मला कळेल कां ?" मी विचारलें.

"माझेंच नांव रोझॅलीन, तुम्हीं नक्की या, मी वाट बघतें." हास्याच्या किणकिणाटांत मला उत्तर मिळालें.

एका अत्यंत अद्ययावत, नीटनेटक्या अशा खोलींत मी बसलों होतों. माझ्यासमोर १८।१९ वर्षांची, रेखीव बांध्याची, गोरटेली आणि गोड चेहऱ्याची एक मुलगी टाईप-रायटरशीं चाळा करीत बसलेली होती. हिचें नांव रोझॅली. तिच्या पायाशीं अगदीं लागून जणूं या तिच्या शरीराचाच एक भाग असावा, अशी लॅब्रॉडॉर जातीची, पाणीदार डोळे असलेली एक कुत्री बसली होती. तिचें नांव ट्रिक्सी.

वयाच्या तिसऱ्या वर्षापासून रोझॅलीनची दृष्टि गेली. सुरवातीला थोडेसे उपचार, ऑपरेशन इ. केले पण मग नाद सोडन देण्यांत आला. लहानपणापासून हिला लिहिण्याची आवड. ह्या अंध लोकांत दोन प्रकार असतात. कांहींना भरभर वाचतां येतें, तर कांहींचा लिहिण्याचा वेग बराच असतो; परंतु वाचन तितकेसें जमत नाहीं. रोझॅलीनची गणना दुसऱ्या वर्गात करावी लागेल. आपल्याइतक्या वेगानें ती 'ब्रेल'मध्यें मजकूर लिहूं शकते.

शालेय शिक्षण पुरें केल्यानंतर तिनें आपल्या जीवनाची रेषा निश्चित केली आणि स्टेनोचा व्यवसाय निवडून तो अभ्यासक्रम






अनुक्रमणिका

यशस्वीरीत्या पुरा करून ह्या अत्यंत मोठ्या इंजिनिअरिंग फर्ममध्यें ती नोकरीस लागली.

तिला ऑफिसमध्यें स्वतंत्र खोली देण्यांत आली आहे. तिच्या वरिष्ठांनीं सांगितलेल्या नोट्स घेण्यासाठीं एक नवीन तऱ्हेचें ब्रेल शॉर्टहँड मशीन तिच्या टेबलाजवळ वसविण्यांत आलें आहे. त्यांनीं सांगितलेला शब्दन्‌शब्द ह्या यंत्रांत बसविलेल्या १ इंच रुंदीच्या कागदाच्या पट्टीवर ठिपक्यांच्या भाषेंत ही लिहून घेते. नंतर ही टेप त्यामधून काढून घेऊन टाईपरायटरच्या खालच्या भागावर पसरते, व त्यावरील अक्षरें बोटानें वाचून मग भरभर टाईप करते. विशेष नवलाची गोष्ट म्हणजे तिचा टाईप-रायटर सर्वसाधारण टाईपरायटरप्रमाणेंच आहे. हें सर्व लिहिण्यास मला वेळ लागला परंतु हें सर्व काम रोझॅली अत्यंत वेगानें आणि कौशल्यानें करते. इतकें कीं श्री. ओलीन यांना 'तुम्हांला नवीन डोळस टाई-पिस्ट सेक्रेटरी पाहिजे का ?' असें विचारलें असतां त्यांनीं ह्या गोष्टीस साफ नकार दिला.

"मि. जोशी ! तुम्ही सिगरेट ओढतां का ? मी तरी किती वेंधळी आहे बघा ! वास्तविक आल्यावरोवर ही गोष्ट तुम्हांस विचारावयास पाहिजे होती, —" आपली माहिती मध्येंच थांबवून, सिगरेट पुढें करीत ती म्हणाली.

"मी नेहमीं ओढीत नाहीं पण तुला 'कंपनी' पाहिजे असल्यास जरूर देईन." असें म्हणत मी आमच्या सिगरेटस् पेटविल्या.



इकडे सिगरेट ओढणें—अगदीं स्त्रियांनीं-सुद्धां—वावगें समजत नाहीत. स्त्रीसमोर धूम्रपान करावयास आधीं तिची परवानगी घेण्याची पद्धत आहे. स्त्री मात्र पुरुषांच्या समोर बेफिकीरपणें धूर सोडूं शकते. आमच्या ऑफिसमधल्या एका दीडशहाण्या मुलीनें मला "तूं धूम्रपान करूं नकोस पण तुला लायटर जवळ बाळगण्यास कांहींच हरकत नाहीं– आम्हांला उपयोगाला येईल"– असा पोक्त सल्ला देऊन मला सिगरेट न ओढतांच ठसका लावला होता.

"हें बघ ! रोझॅली, मी तुला आतां थोडा मजकूर सांगतों तो मला तूं टाईप करून दाखविशील का ?" मी विचारलें.

"जरूर ! मला खूप आनंद वाटेल–" असें म्हणून ती बोटानें मशीन चांचपडूं लागली– "रेडी मि. जोशी !"

मी 'डेली टेलिग्राफ' या वर्तमानपत्रांतील सुमारें २५ ओळी मजकूर सांगितला व तिच्या हालचालींकडे निरखून पाहूं लागलों. बरोबर ४५ व्या सेकंदाला माझ्या हातांत टाईप केलेला कागद तिनें दिला आणि म्हणाली, "मि. जोशी, गांवांच्या नांवाचें स्पेलिंग कदाचित चुकलें असेल, क्षमा करा !"

"खरोखर तूं एक 'वंडरफुल' मुलगी आहेस! सर्व मजकूर बरोबर आहे. एकही चूक नाहीं." मी मजकूर वाचल्यावर उद्‌गारलों. प्रात्यक्षिक दाखविल्याबद्दल मी तिचे आभार मानले व म्हटलें,

"आतां मला तुझ्या ट्रिक्सीबद्दल कांहीं माहिती सांगशील का ?

"ती एक छान मुलगी आहे ! (भाषा लक्षांत घ्या. हा मजकूर कुत्रीबद्दल आहे. पाळीव आणि पाळणाऱ्यांची ही एक भाषा असते.) तिच्या शिवाय माझें मुळींच चालणार नाहीं. ती मला घरापासून ऑफिसपर्यंत अगदीं व्यव-स्थित आणते. कुणालाहि रस्ता विचारावा लागत नाहीं. तुम्हांला आश्चर्य वाटेल, पण रोज ४ पेन्नींचा बसचा प्रवासहि आम्हांला करावा लागतो. अजूनपर्यंत एकदांहि मी चुकीच्या बसमध्यें कधीं बसलें नाहीं. ट्रिक्सीचा खरा उपयोग मला रस्ता ओलांडतांना होतो.

(येथें आपल्या लोकांच्या माहितीसाठीं एकदोन गोष्टी सांगाव्याश्या वाटतात. पादचाऱ्यांनीं रस्ता ओलांडण्याच्या जागा ठरविलेल्या असतात. मोटारींना वेगाचें नियंत्रण नसतें. मोटारींची मिनिटाला संख्याहि आपल्या फोर्टमधील संख्येच्या चौपट असते. आणि ह्या सर्व गोष्टी जमेस धरून ती ट्रिक्सी आपल्या अंध मैत्रिणीला अगदी व्यवस्थित सुखरूप नेत असते. तिच्या छोटचा छोटचा वस्तूहि ती बरोबर आणते.)

"तुझा खूपच वेळ घेतला. मला तुझी माहिती दिल्याबद्दल तुझा आभारी आहे", असें म्हणून मी माझे कागदपत्र बॅगेमध्यें घालूं लागलों. एवढ्यांत मि. ओलीन आंत आले आणि म्हणाले, "आमची रोझॅलीन लबाड आहे. तिनें सर्व माहिती तुम्हांला सांगितली नाहीं. ती सिनेमा खूप पहाते ही गोष्ट तिनें लपवून ठेविली होती. होय कीं नाहीं रोझ ?"

"पण तुला सिनेमा कसा काय समजतो?"– मी आश्चर्यानें विचारलें.

"आतां मूकपटाचा जमाना गेला मि. जोशी." तिनें मला निरुत्तर केलें.

"आतां शेवटचा प्रश्न–ट्रिक्सीचा ठसा घेण्याचें कारण ?"

"अहो, मला एकटीला कोण विचारतो. ती आहे म्हणून मी आहे, होय कीं नाहीं ग?" असें म्हणत आपल्या लांबसडक बोटांनीं ती ट्रिक्सीला कुरवाळूं लागली.

"थँक यू ! रोझॅलीन–थँक यू मि. ओलीन. गुडबाय" असें म्हणून मी खोलीबाहेर पडणार इतक्यांत ट्रिक्सी आपले दोन्ही पाय माझ्या बॅगेवर ठेवून उभी राहिली. जणूं काय तिला म्हणावयाचें होतें, तुम्ही मला गुडबाय कां केला नाहीं ?

मी गुडबाय करण्यासाठीं हात पुढें करतांच एकाद्या माणसाप्रमाणें उजवा पंजा पुढें करून त्या मुक्या प्राण्यानें मला निरोप दिला. ●●●



अनुक्रमणिका

एक न–नाट्य



दि. श्री. कराडकर

# आ गी ला ला ग ली आ ग!

ज्याच्यांत नाट्य नाहीं तें न (व)–नाट्य अशी एक सुटसुटीत पण चुकीची व्याख्या नव-नाट्याची केली जाते. नव-नाट्यांतही नाट्य आहे पण तें सादृश्य नसतं इतकंच. ह्या नाट्याचं आणखी एक महत्त्वाचं अंग म्हणजे चुरचुरीत संवाद. नवनाट्य फुलतं तें मुळीं ह्या असल्या संवादांनीं. नेमकी हीच वैशिष्ट्यें पुढील नवनाट्यांत आढळतात, ज्यांत जीवनांतला भकासपणा प्रतीत झाला आहे.

**पात्रें**

'श्री. केळकर. ३६. सौ. केळकर'
'श्री. वसंत दाते. ६३. सौ. तारा दाते.'
काश्या — नोकर
अग्निशामक दलाचा कप्तान.

[ दृश्य घरांतील थाट अस्सल पुणेरी, कळकट आरामखुर्च्या, केवळ पुण्यांतच शोभून दिसणारी एक अस्सल संध्याकाळ, अस्सल पुणेरी श्री. केळकर, त्यांच्या आवडत्या आरामखुर्चीत, पुणेरी जोडे घातलेले, पुणेरी तपकीर ओढण्याची सारखी संवय, पुणेरी वर्तमानपत्र वाचीत आहेत, शेजारीं पुणेरी अंजिरांची करंडी, मधुनमधून नाक उडविण्याची पुणेरी संवय, डोळ्यांवर पुणेरी चष्मा, ओठांवर पुणेरी मिश्या – टिळकांसारख्या, दुसऱ्या आरामखुर्चीत सौ. केळकर, ह्यासुद्धां अगदीं अस्सल पुणेरी, गोधडी शिवत वसल्या आहेत.
दीर्घ पुणेरी स्तब्धता.
एका मोठ्या पुणेरी घड्याळांत तीन अस्सल पुणेरी ठोके पडतात — म्हणजे ठोक्यांच्या नादांत लय नाहीं. ]

सौ. केळकर : सहा वाजून कीं हो गेलें ! म्हणा रात्रीं जेवणासाठीं सकाळचं सार आहे. भात झालाच आहे, तुम्हांला लागते म्हणून पोळी आहे, मांझ्यासाठीं भाकरी आहे, पुणेरी मटारांची उसळ आहे. शिवाय खास पुण्यांतलं दूध आहे आणि प्यायला अस्सल पुणेरी पाणी आहे. अहाहा ! काय थाट ? आणि आपण दोघे जेवणारेही अस्सल पुणेरी. अगदीं नांवांत सुद्धां पुणेरी–केळक्कर !
[ श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज ]
वाकी मटार आज चांगल्या शिजल्या आहेत हो. कांहीं कांहीं वेळां वरी देतात भाजी. नाहीतर मेले एकजात शिष्ट. नाहींतरी हल्लीं पुण्यांत भाजीवाले फार शिष्ट झालेत आणि त्यांचं बघून हे दुकानदार शेफारलेत. कोपऱ्यावरचे जोशी इतके शिष्ट आहेत कीं त्यामुळें समोरचे गोडबोले शिष्ट बनले आहेत. परवां जोश्यांना विचारलें कीं 'गूळ चांगला आहे का हो ?' तर म्हणतात 'वाईट गूळ समोर गोडबोल्यांकडे मिळेल.' गोडबोल्यांना

म्हटलं, 'तुमच्याकडे खरंच वाईट गूळ मिळतो का ?' तर मलाच सुनावतात कीं 'आमचा सगळा खराब गूळ जोशी विकत घेतात आणि तो चांगला म्हणून गिऱ्हाईकांना विकतात.' चहाटळ मेले. पुण्याला ही शिष्टाईच फार मेली.

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

मी तर आतां ठरवलंय् अगदीं काडयापेटी आणायची झाली तरीसुद्धां त्या दोघांचं तोंड म्हणून पाह्यचं नाहीं. शनीच्या पारावरील गोळे बरा. मेला रिकामी काडयापेटी तरी देत नाहीं त्या गोडबोल्यासारखा ! आणि वर म्हणतो, पॅक माल असतो. आम्ही जबाबदार नाहीं. कंपनीला लिहा !

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

सकाळीं वटाटयाची भाजी छान् झाली होती ना हो ? आणि वटाटयाची भाजी अशी असते कीं ती छान् झाली तरच चविष्ट लागते !

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

अरुला फार आवडते वटाटयाची भाजी. सकाळीं नुसता आवाश्यासारखा खात होता. बघितलंत ना तुम्ही ? अगदीं सारखी पातेलीवर नजर ठेवून होता. नाहींतरी भारीच हुंवरट आहे तो. अगदीं नको तो गुण घेतलाय् बापापासून.

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

लक्ष्मी रोडवर फक्त बायकांच्या पादत्राणांचं दुकान निघालंय् म्हणे. दुकानदार 'फॉरेन रिटर्ण्ड' आहे. चांभार म्हटलं तर चिडतो, 'शू-डिझायनर' म्हणा म्हणे. शेजारची मालू म्हणत होती कीं त्याच्याकडे मिळणाऱ्या चपलांमध्यें चामडं नसतं. पण झक्क एडी असते. तशी एखादी चप्पल विकत घेईन म्हणतें.

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

आणि त्या चपला घातल्यानें पायाचे स्नायु वळकट होतात म्हणे. डॉ. परांजपे परवां कांहीं पेशंट्सना सांगत होते तेव्हां ऐकलं हो मी. डॉ. परांजप्यांना बायको म्हणे हल्लीं दम देते, 'तुम्ही काय समजलांत ? मिजास नको तुमची. माझ्याही पायांत जोर आहे.' पूर्वी असं कधींही न बोलणारी आपली बायको हल्लींच असं कां बोलूं लागली म्हणून डॉक्टरांनीं शोध केला तेव्हां त्यांना कळलं कीं हल्लीं आपली बायको 'एडी' असलेल्या चपला घालते !

[श्री. केळकर वर्तमानपत्र वाचण्यांत दंग, तोंडानें च् च् च् असा आवाज]

परांजप्यांचं एक बरं आहे बाई. सगळीं औषधं प्रथम स्वत: पितात, मग पेशंटला पाजतात ! अगदीं गेल्या वर्षी ओकांवर लिव्हरचें ऑपरेशन करण्यापूर्वी प्रथम स्वत:च्या लिव्हरचें ऑपरेशन केलें.

कम्माल आहे बाई त्यांची !

श्री. केळकर : अस्सं ना ? मग परांजपे तेवढे जिवंत राह्यले, आणि ओक तेवढे मेले. हें कसं काय ?

सौ. केळकर : म्हणजे काय ? डॉक्टरांवर ते ऑपरेशन यशस्वी झालं. ओकांवर नाहीं.

श्री. केळकर असं जर आहे तर परांजपे म्हणावे तितके चांगले डॉक्टर नाहींत. एक तर ऑपरेशन दोघांवरही यशस्वी व्हायला हवं होतं नाहींतर दोघेही खलास व्हायला हवे होते.

सौ. केळकर तुमचं आपलं कांहींतरीच. भलत्याच ठिकाणीं तर्क कसले लढवतां ?

श्री. केळकर : बरं जर ते दोघेही बरे होऊं शकत नाहीं तर मग खरा निष्ठावंत डॉक्टर असेल तर तो पेशंटबरोबर मरण पत्करेल. बोट बुडाली कीं बोटीचा कप्तानही बोटीबरोबर बुडतो.

सौ. केळकर पण पेशंटची बोटीबरोबर कशी तुलना करतां ?

श्री. केळकर : काय चूक आहे त्यांत ? नियम सगळ्यांना सारखा लागूं पाहिजे. बोटीलाही नाना रोग जडतातच. विकृति म्हणूंया आपण पाहिजे तर. त्यांची पूछताछ कप्तानच करतो. आपलं शरीर म्हणजे सुद्धां एक जहाज आहे; आणि ह्या जहाजाची डागडुजी डॉक्टर करतो. मग त्या जहाजाचा कप्तान तेवढा जहाजाबरोबर मरावा आणि ह्या जहाजाचा तेवढा न मरावा. हे कसं पटावं ?

सौ. केळकर : तुमची अक्कल किनई हल्लीं घोडयापुढें धांवायला लागली आहे. म्हणे शरीर म्हणजे एक जहाज आहे. अहाहा ! तुमच्याशीं वाद घालण्यांत अर्थ नाहीं हेंच खरं.

श्री. केळकर : तुला नाहीं पटायचं तें. हल्लीं सगळे डॉक्टर ढोंगी झाल्येत; आणि त्यांचे पेशंटस् सुद्धां. पुण्यांत ढोंगी होण्याचे कोण उरले असतील तर तेवढे पेन्शनर.

सौ. केळकर : स्वत:वरून जग ओळखतां कीं काय ?

## महत्त्वाची सूचना-

ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

—व्यवस्थापक






अनुक्रमणिका

श्री. केळकर : काय हवं ते समज. फक्त सत्य सांगितलं.

[अजून वर्तमानपत्रांतील लक्ष काढून घेतलेलें नाहीं.] आतां ही जाहिरातच पहा ना – 'आम्ही माफक दरांत वाजंत्री वाजवतों.' मी म्हणतों तुम्ही वाजंत्रीचे भरमसाट दर घेता शिवाय वर अडवणूक आहेच पण तरीही हा माफक दराचा ढोंगीपणा कां ? तशीच ही जन्म-मृत्यु नोंद ! लेकाचे मृताचे वय देतात पण जन्मलेलं मूल किती वर्षांचं आहे तें कां नाहीं देत ?

सौ. केळकर : हें बाकी माझ्याही लक्षांत आलं नव्हतं हं.

[घड्याळांत चार ठोके पडतात. स्तब्धता. घड्याळांत तीन ठोके पडतात. स्तब्धता. घड्याळांत शून्य ठोके पडतात.]

श्री. केळकर (वर्तमानपत्र वाचन चालूंच––) नंदा नवरंगे आटपला.

सौ. केळकर खरंच कीं काय ? केव्हां गेला ?

श्री. केळकर : कां ? तुला कां एवढं आश्चर्य वाटलं ? नवरंगे गेला हें तुला पक्कं ठाऊक आहे. दोन वर्षांपूर्वी. तुला आठवतंय् तूं दारावर सुद्धां गेली होतीस.

सौ. केळकर : आठवलं. आठवलं. पण तुम्हींसुद्धां आश्चर्यचकित होऊन वर्तमानपत्रांत वाचलंत.

श्री. केळकर वर्तमानपत्रांत नव्हतं तें. कांहींतरी कल्पना डोक्यांत गोळा झाल्या आणि एकदम नवरंगे आटपल्याचं आठवलं.

सौ. केळकर : कमाल आहे बाई. तुमची अक्कलच बिघडली आहे हल्लीं.

श्री. केळकर : नवरंगे गेला तेव्हां तो तरुण होता–म्हणजे जाण्याचं वय नव्हतं.

सौ. केळकर : हो ना ! –– 'कसं होईल माझं ?'

श्री. केळकर अं, काय म्हणालीस ? 'कसं होईल माझं ?'

सौ. केळकर : असं त्याची बायको म्हणाली होती, त्यावेळीं. तें आठवलं मला.

श्री. केळकर म्हणजे हल्लीं तुझीही अक्कल बिघडली आहे तर.

सौ. केळकर त्याच्या बायकोची आठवण होणं ह्यांत अक्कल कशी बिघडली ? तिचं नांवही नंदा. त्यामुळें किती घोटाळा व्हायचा बाई. ते जोडपं समोरून येत असलं कीं निश्चितपणें एकाला हांक मारणें जड जायचं. एक मेल्यानंतरच दुसऱ्याला हांक मारणं आतां सोपं झालंय्. तुम्ही तिला बघितली आहे कां हो ?

श्री. केळकर : फक्त एकदांच. नंदाच्या शवावर घालण्यासाठीं पंचा आणायला आंत गेलों होतों तेव्हां कोपऱ्यांत बसलेली बघितली.

सौ. केळकर बरी आहे नाहीं दिसायला ?

श्री. केळकर : तेव्हां फक्त तिचे अश्रु दिसले. पुढें बोला.

सौ. केळकर : ती म्हणे हल्ली गाणं शिकवते. क्लास काढलाय् शनवारांत!

[घड्याळांत तीन ठोके पडतात.]

श्री. केळकर : तुला 'कॉन्फिडेन्शिअल' खूप माहिती दिसतंय् ?

सौ. केळकर : ती म्हणे लग्न करणार आहे पुन्हां.

श्री. केळकर करूं दे. तुम्हांला हवी आहे तशी मंत्रि ?

सौ. केळकर कांहींतरीच काय बोलतां ?

श्री. केळकर आपल्याला जर तिनें लग्नाला बोलावलें तर तिला प्रेझेंट काय द्यायचं ?

सौ. केळकर आपल्या लग्नाच्या वेळीं आपल्याला ट्रे मिळाला होता तो देऊं या. आपण नाहीं वापरला तर ती तरी वापरेल ! (निःश्वास) इतक्या लहान वयांत तिच्या नशिबीं वैधव्य यायला नको होतं.

श्री. केळकर तिला मुलं आहेत का ?

सौ. केळकर फक्त दोन.

श्री. केळकर मग तिनें पुन्हां लग्न केल्यावर ह्या फक्त दोनांची काळजी कोण घेणार ?

सौ. केळकर तुम्हांला निश्चित नाहीं सांगणार.

श्री. केळकर मग ठीक आहे.

सौ. केळकर : एक मुलगी आणि मुलगा तर आहे. त्यांचीं नांवंही मोठीं मजेशीर आहेत.

श्री. केळकर मजेशीर म्हणजे ?

सौ. केळकर नंदा आणि नंदा – अगदीं आईबापांसारखी. नंदा नवरंग्याचा काका –वुढ्ढा नंदा नवरंगेकडे रगड पैसा आहे. करील शिक्षण पोरांचं. नातवाकडे ओढा जास्त आहे त्याचा.

श्री. केळकर फार छान !











*सुगंधीच्या तोंडाला दारूचा वास येत आहे हे माधवनें तात्काळ ओळखलें. त्यानें ही संधि साधायचीच असें ठरविलें. सुगंधीकडे त्यानें इन्स्पेक्टरला देण्यासाठीं पैशांची मागणी केली. आणि पुढें काय झालें ....?*

सुप्रसिद्ध उर्दू कथालेखक
सआद्रत हसन मंटो
*ह्यांच्या गेल्या अंकापासून सुरू झालेल्या–मानहानि–ह्या दीर्घ कथेचा ('हतक'चा) हा उत्तरार्ध.*

**--अनु : वामन प्रभु**

**सुगंधी** विचार करीत होती व पायांपासून तो डोक्यापर्यंत तिच्या अंगांत गरम गरम लहरा उठत होत्या. कधीं तिला स्वतःचा राग यायचा तर कधीं रात्रीं दोनला झोंपेंतून जागे करणाऱ्या रामलालचा. पण क्षणांतच त्यांना निर्दोष ठरवून ती शेठचा विचार करायची. तो विचार येतांच तिचे डोळे, तिचे कान, तिचे हात, तिचे पाय, तिचं सारं अंग शेठजीला पहायला उत्सुक व्हायचं. जें कांहीं झालं तें ह्या शेठमुळंच असं तिला जोरदार-पणानं वाटायचं व तें सारं पुन्हां घडावं अशी तिला इच्छा व्हायची... फक्त, पुन्हां अेकदांच...... हळुहळू आपण मोटारकडे सरकावं, मोटारींतून टॉर्च असलेला अेक हात बाहेर यावा व तिच्या चेहऱ्यावर प्रकाशाचा एक झोत पडावा, अुंऽहुंचा आवाज यावा व आपण–सुगंधीनं–बेताल होऊन दोन्ही हातांनीं शेठचं तोंड ओरबा-डायला सुरवात करावी. रानटी मांजरी-सारखं झपटावं... नव्या 'फॅशन' सारखें वाढविलेलीं बोटांचीं नखें त्या शेठजीच्या तोंडावर रोवून टाकावींत....... केसांना धरून त्याला बाहेर ओढून काढावं व धडाधड मारायला सुरवात करावी. आणि जेव्हां थकवा येईल तेव्हां रडायला लागावं.

क्रोधामुळं व विवशतेमुळं तिच्या डोळयांत दोन मोठ–मोठे थेंब जमा होत होते. येव-ढ्याच करतां तिला रडावसं वाटलं होतं; एकाएकींच तिनं आपल्या डोळ्यांना प्रश्न केला– 'तुम्हीं कां रडतां ? तुम्हाला काय झालंय की तुम्ही टपकता आहात ?' आंसवांना केलेला प्रश्न कांही वेळ आंसवां-तच तरंगत राहिला, मग बराच वेळपर्यंत सुगंधी, त्या आसवांमधनं मोटार निघून गेलेल्या दिशेला शून्यपणें पाहतच राहिली.

फड., फड फड... अरे, हा आवाज कुठनं आला ? दचकून सुगंधीनं आजुबाजूला पाहिलं पण कुणीच दिसलं नाहीं.... अरे, हें तर तिचं हृदयच फडफडत होतं. ती तर समजत होती की हा आपला इंजिनाचाच आवाज आहे म्हणून ! चांगलं चालतं-बोलतं हृदय असं एका जागींच थांबून कां धडधडत आहे ? अगदीं घासल्या गेलेल्या रेकॉर्डसारखं. सुई खालीं येऊन एका जागींच थांबून गेलंय. 'रात कटी गिन गिन तारे' म्हणतां म्हणतां सारखं 'तारे–तारे' रटून राहिलं आहे.

आकाश ताऱ्यांनीं भरलेलं होतं. त्यांच्या-कडे सुगंधीनं पाहिलं आणि म्हटलं, 'किती सुन्दर आहेत !'... आपलं लक्ष कुठं वेगळ्या जागीं बांधण्याचा ती प्रयत्न करीत होती. पण तिनं 'सुन्दर' म्हणून म्हटलं अन् झटकन् तिला आठवलं – 'हे तारे तर सुन्दर आहेत. पण तूं कशी भोंडी... काय विसरलीस की आता आताच तर तुझं रूप फटकारलं गेलं आहे ?'

सुगंधी कुरुप नव्हती. हा विचार येतांच गेल्या पांच वर्षांतलें तिनं आरशांत पाहिलेलें सारें प्रतिबिंब तिला आठवलें. आजच्या पांच वर्षांपूर्वीचें. जेव्हां ती साऱ्या काळज्यां-पासून दूर आपल्या आई वडलांजवळ होती, तेव्हांचें रूप–रंग– तिजजवळ आज नव्हतें, ह्यांत कांहीं शंकाच नव्हती. पण म्हणून ती कांहीं कुरुप झाली नव्हती. मोका मिळ-तांच ज्यांच्याकडे पुरुष पाहून घेतात अशा साऱ्याच जणींसारखं तिचं रूप होतं. पुरुषांना, ज्या स्त्रियांजवळ एक दोन रात्रीं घालवा-यच्या असतात, त्या स्त्रियांचें सारें गुण तिजजवळ अजूनहि होते. ती तरुण होती, तिचें अवयव सुडौल होते. कधीं कधीं स्नान करतांना तिची दृष्टि आपल्या मांड्यांवर जायची तेव्हां ती स्वतःच त्यांच्या गोलाईला व पुष्टतेला पसंत करायची. ती हंसतमुख होती. गेल्या पांच वर्षांत चुकूनच कोणी पुरुष असंतुष्ट होऊन तिजजवळून गेला असेल... मोठी मनमिळावू, मोठी सहृदय होती ती. मागल्या दिवसांत ती 'गोलपिठचाला' रहायची तेव्हां क्रिसमसच्या दिवसांत एक तरणा पुरुष तिजजवळ आला होता.

दुसरे दिवशीं सकाळीं उठून बाजूच्या खोलींत खुंटीवरचा कोट घ्यायला तो गेला तेव्हां त्याचा बटवा गायब होता. सुगंधीचा नोकर बटवा घेऊन पसार झाला होता. बिचारा फार त्रासून गेला होता. सुटचा घालवायला म्हणून हैद्राबादेंतून मुंबईला आलेला होता. वापस जायला सुद्धां आतां त्याजजवळ पैसे नव्हते. दया येऊन सुगंधीनं त्याला त्याचे दहा रुपये तेव्हां वापस केले होते– 'काय वाईट आहे माझ्यांत ?' तिच्या समोर असणाऱ्या साऱ्या वस्तूंना सुगंधीनं हा प्रश्न केला. गॅसचा आंधळा दिवा, लोखं-डाचा खांब, फुटपाथचे चौकोनी दगड आणि सडकेची उखडलेली गिर्री, ह्या साऱ्यांकडे तिनं पुनः पुन्हा पाहिलं. मग तिच्या डोक्या-वरल्या आकाशाकडे तिनं पाहिलं. पण सुगंधीला कांहींच उत्तर मिळालं नाहीं.

उत्तर तिज–जवळच होतं. तिला माहिती होतं का आपण वाईट नाहीं, चांगले आहोंत. पण तिची इच्छा होती की कुणी ह्याला पुष्टी द्यावी.... कोणी... कोणी तरी ह्या-



अनुक्रमणिका






वेळेला आपल्या खांद्यावर हात ठेवावा व आपल्याला फक्त इतकंच सांगावं की– 'सुगंधी, कोण म्हणतं तूं वाईट आहेस म्हणून ! तुला वाईट म्हणणारा स्वतःच वाईट असेल.'... नाहीं, हे सांगण्याचीहि कांही खास जरूर नाहीं. कुणाचं फक्त येवढंच म्हणणं पुरे होतं– 'सुगंधी, तूं फार चांगली आहेस.'

आपल्याला कुणी चांगलं म्हणावं असं कां वाटतं याचा ती विचार करूं लागली. ह्यापूर्वी तिला ह्या गोष्टीची येवढी आवश्यकता वाटली नव्हती. आपण चांगले असण्याची अनुभूति ज्यांवर कोरल्या जावी अशा जड वस्तूंकडे आज कां तिनं असल्या नजरेनं बघावं. तिच्या शरीराचा कणन्‌कण कां म्हणून 'आई' होत होता? आई होऊन ती धरतीवरची प्रत्येक वस्तु आपल्या कुशींत घ्यायला कां तत्पर झाली होती? समोरच्या गॅसच्या लोखंडाच्या खांबाला बिलगून जावं व त्याच्या गार लोखंडावर आपले गाल टेकवावेत–असं तिला कां वाटत होतं ? आपल्या गरम गरम गालांनीं त्याचा सारा गारवा पिवून घ्यावसं तिला कां वाटत होत ?

थोडया वेळपर्यंत तिला वाटत राहिलं की गॅसचे आंधळे दिवे, लोखंडाचा खांब, फुटपाथचें चौकोनी दगड आणि रात्रीच्या भयाण शांततेंत तिच्या आजुबाजूला असणारी प्रत्येक वस्तू तिच्याकडे सहानुभूतीनं बघते आहे. मळक्या रंगाची, असंख्य छिद्रें असलेली तिच्या डोक्यावरची आकाशाची मोठी चादर आपल्याला समजून घेते आहेसं तिला वाटत होतं–आणि ती पण ताऱ्यांचं लुकलुकणं समजावून घेऊं शकत होती. पण तिचे अंतरांत हा कसला गोंधळ होता ?.... ....पाऊस पडण्यापूर्वीचं वातावरण आपल्यांत आहेसं तिला कां म्हणून वाटत होतं ? शरीराचं प्रत्येक रंध्र उघडं व्हावं व आपल्या अंगांत असलेलं सारं उबळणारं बाहेर पडावं असं तिच्या मनाला वाटत होतं. पण हें व्हावं कसं ? कसं व्हावं ?

गल्लीच्या वळणावर पोस्टाच्या पत्रांच्या पेटीला लागून सुगंधी उभी होती. हवेच्या



झोतानं, पत्रांच्या पेटीची तिच्या तोंडांत लटकणारी लोखंडी जीभ, खडखडली तस एकदम सुगंधीचं लक्षं, मोटार गेलेल्या दिशेनें वळलं. पण तिला कांहींच दिसलं नाहीं तिची किती तीव्र इच्छा होती की, एकदां तो शेठ मोटारनं एकवेळ पुन्हा यावा, आणि... आणि...

"न येवो... मर म्हणावं... मी कां उगाच आपल्या जीवाचा फडफडाट करून घ्यावा? घरीं जाऊन आरामांत मस्त झोपतें. ह्या गोंधळांत ठेवलंच काय आहे ? फुकटची डोकेंदुखी तर आहे..... चल सुगंधी, घरीं चल, गार पाण्याची एक नरवटी पी, थोडा बाम कपाळाला चोळ व झोपी जा. मस्त झोप येईल व सारं ठीक होईल...शेठजीची नि त्याच्या मोटारीची अशी तशी..."

ह्या विचारानं सुगंधीचा भार थोडा हलका झाला. जशी ती गार पाण्याच्या तलावातनं स्नान करून बाहेर आली होती! पूजा केल्यानंतर हलकं व्हायचं तसं तिचं शरीर आतां हलकं झालं होतं.

आपल्या खोलीजवळ ती आली तशी एका मागोमाग एक साऱ्या घटना तिला आठवल्या व एखाद्या दुःखासारख्या तिच्या रोमरोमांत पसरल्या. पाय परत जड पडले व घरून बोलविल्या जाऊन, बाहेर बाजारांत तोंडावर प्रकाशाची थप्पड मारून एका माणसानं आपली मानहानि केल्याचं तिला परत जोरानं वाटायला लागलं. हा विचार येताच तिला आपल्या फांसळ्यांवर कुणाचें कठोर अंगठे असल्याचं जाणवलं; जसा कुणी तिला बकरीसारखं दाबून दाबून पाहतो आहे की, कांहीं मांस आहे की बस, नुसतं केंसचं केस ! – 'त्या शेठनं – देव करो... सुगंधीला वाटलं की त्याला शाप द्यावा, पण मग विचार केला की ह्यांनी होणार काय ? तो समोर असतां व त्याच्या अस्तित्वाच्या प्रत्येक क्षणावर तिनं आपला धिक्कार लिहिला असता तर कांहीं मौज होती. आयुष्यभर त्याला आठवीत रहावं असं कांहीं ती त्याच्या तोंडावर बोलती.... कपडे फाडून, त्याचे समोर ती नंगी होती आणि त्याला म्हणती.... 'हेंच घ्यायला आला होतास ना तूं ? घे, किंमत न देताच घेऊन जा हें....पण जें कांहीं माझं आहे, माझ्यांत जें कांहीं लपून आहे, ते तूं काय, तुझा बाप सुद्धा विकत घेऊं शकत नाहीं....

बदला घ्यायचे नवे नवे मंत्र सुगंधीला सुचत होते. जर त्या शेठशीं एकदांच–फक्त एकदांच - तिची गांठ पडती – तर ती असं करती–अशा तऱ्हेनं त्याचा बदला घेती– नाहीं, असा नाहीं, अस्सा – पण शेठशी परत गांठ पडणार नाहीं हें सुगंधीला उमगून यायचं व त्याला फक्त एक शिवी

देण्यांतच ती स्वतःला खूष करायची– बस, फक्त एक छोटीशी शिवी ! एखाद्या चिपकून राहणाऱ्या माशीसारखी त्याच्या चपट्या नाकावर चिपकावी व तिथेंच चिकटून रहावी.

ह्याच गोंधळांत ती आपल्या दुसऱ्या मजल्यावरल्या खोलीजवळ येऊन पोंचली. चोळींतून चावी काढून कुलूप उघडायला म्हणून ती गेली तर चावी हवेंतच फिरली. कडीला कुलूप नव्हतंच. सुगंधीनं दारं आंत लोटली तर आतनं पलंग कचकचल्याचा थोडासा आवाज झाला. आतनं कडी उघडली गेली व ती आंत आली.

मिशांतच माधव हंसला व म्हणाला, "अाज शेवटीं तूं माझं म्हणणं ऐकलंच तर– सकाळचं फिरणं आरोग्याला फार छान असतं. दररोज जर असंच सकाळला फिरायला जात जाशील तर तुझी सारी सुस्ती नाहींशी होईल व बरोबरच तुझं कंबरेचं दुखणं पण ठीक होईल. नेहमी तूं आल्या-गेल्या त्याबद्दल तक्रार करीत असतेस. व्हिक्टोरिया गार्डनपर्यंत तर जाऊन आलीच असशील तूं, काय ?"

सुगंधीनं कांहीं उत्तर दिलं नाहीं व माधवनंहि अपेक्षा केली नाहीं. माधव वेताच्या खुर्चीवर बसला. त्याच्या तेल चोपडलेल्या केसांमुळं खुर्चीला पाठीवर तेलाचा एक मोठ्ठा डाग पडला होता. पायांवर पाय ठेवून तो बसला व आपल्या मिशांवरून बोटं फिरवूं लागला. सुगंधी पलंगावर बसली व म्हणाली, "मी तुझी वाटच पाहत होते...."

माधव अगदीं खूष झाला. "माझीच वाट ? पण तुला कसं ठाऊक कीं मी आज येणारच म्हणून ?" दुमडलेले ओठ सुगंधीनं अलग केले. एक पिवळट स्मित तसं त्यांवरून गेलं, "रात्रीं मी तुला स्वप्नांत पाहिलं. उठली तर कुणी नव्हतं. म्हणून जरा बाहेर फिरून आले आणि..."

खूष होऊन माधव म्हणाला, "आणि मी आलों. व्वा, मोठ्या माणसांच्या कल्पना मोठ्या पक्क्या असतात. हृदयाला हृदयाची ओढ असते हें कुणीसं बरोबरच म्हटलं आहे. तूं तें स्वप्न कधीं पाहिलंस?"

"जवळ जवळ चार वाजतां" माधव खुर्चीवरून उठून सुगंधीजवळ बसला. म्हणाला, "मीं अगदीं ठीक दोन वाजतां तुला स्वप्नांत पाहिलं. तूं फुलांची साडी... अरे, तूं तर अगदीं हीच साडी नेसून मज-जवळ आहेस ?... तुझ्या हातांत... काय होतं तुझ्या हातांत ?... हो, रुपयांनीं भर-लेली पिशवी होती. तूं ती पिशवी माझ्या झोळींत ठेवून दिलीस, व म्हणालीस... 'माधव, तूं कां काळजी करतोस ?... घे ही पिशवी— अरे, तुझे माझे पैसे कां दोन आहेत ?' सुगंधी, तुझ्या जीवाची शपथ, तसाच उठलों आणि तिकीट काढून निघून आलों.... काय सांगूं, मोठं संकट आहे ! बसल्या बसल्या एक केस झाली आहे. आतां तीस बत्तीस रुपये असेल तर, इन्स्पेक्टरच्या मुठी दाबून मोकळं होतां येईल... थकलीस तर नाहीं तूं ? लेट जरा, मी तुझे पाय चेपतों. फिरायची संवय नसली म्हणजे असा थकवा येतोच. माझ्याकडे पाय करून जरा लेट तूं."

दोन्ही हातांचीं उशी करून व त्यावर डोकं ठेवून सुगंधी लेटली आणि अगदीं वेगळयाच स्वरांत म्हणाली, "माधव, कुणा डुकरानं तुझ्यावर केस केली रे ? जेल–बिलची भीति असेल तर सांग मला. दहा-वीस कां, पांच-पन्नास सुद्धां अशा वेळीं पोलिसांच्या मुठींत कोंबावेत. मामला साध! जान बची लाखों पाये– पुरे पुरे, असूं देत. कांहीं विशेष थकवा नाहीं. छक्के-पंजे बाजूला ठेव अन् सारं कांहीं मला सांग. केसचं नांव ऐकतांच मी भ्यालें बघ. वापस कधीं जाणार आहेस तूं ?"

सुगंधीच्या तोंडाला दारूचा वास आला. माधवला ही वेळ बरी वाटली व तो झट् म्हणाला, "दुपारच्या गाडीनं वापस जावं लागेल बघ. सायंकाळपर्यंत इन्स्पेक्टरच्या मुठींत पांच-पन्नास द्यायलाच हवेंत. मला वाटतं, पन्नासांत काम होऊनच जाईल."

"पन्चास !" असं म्हणून सुगंधी आरामांत उठली व भींतीवर टांगलेल्या फोटोजवळ गेली. डावीकडून तिसऱ्या फ्रेममध्यें माध-वचा फोटो होता. मोठालीं फुलं असलेल्या पडद्यासमोर आपल्या मांड्यावर हात ठेवून तो खुर्चीत बसलेला होता. त्याच्या एका हातांत गुलाबाचं फूल होतं. जवळच तिपाईवर मोठाली दोन पुस्तकं होतीं. फोटो घेतेवेळीं काढणाऱ्याचें लक्ष माधववर इतकं केंद्रित झालं होतं कीं प्रत्येक वस्तु जशी फोटोंतून बाहेर येऊन ओरडत होती– 'आमचा फोटो–आमचा फोटो.'

माधव कॅमेऱ्याकडे डोळे फाडून बघत होता. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव खूप त्रास-दायक वाटत होते.

( पान ४३ वर पहा )



"तूं म्हणाला होतास लग्नाआधीं कीं तुझें प्रेम प्लेटॉनिक आहे, वैषयिक नाहीं म्हणून...."

( पान ४२' वरून )

सुगंधी मोठ्यानं हंसली. तें हास्य असं कांहीं होतं की माधवला वोचून गेलं. पलंगावरून उठून तो सुगंधीजवळ आला. म्हणाला, "कुणाचं चित्रं पाहून येवढ्यानं हंसलीस तूं ?"

सुगंधीनं डाव्या वाजूच्या पहिल्या फोटोकडे वोट दाखवून म्हटलं, "ह्याच्या...म्युनिसिपालटीचा दरोगा.... जरा वघ तर ह्याचं तोंड... म्हणत होती एक राणी आमच्यावर खूप होती... अुंऽहुं ! हें तोंड कीं मसुरीची डाळ !" असं म्हणतच सुगंधीनं जोरानं फ्रेम ओढली, इतक्या जोरानं की, खिळ्याबरोबरच भितीचं प्लास्टर पण वाहेर अलं. माधवला कांही कळायच्या अंतच सुगंधीनं फ्रेमला खिडकीवाहेर फेंकून दिलं. दुसऱ्या मजल्यावरून फ्रेम खालीं पडली व कांचा फुटल्याचा आवाज़ ऐकूं आला. त्या आवाजाबरोबरच सुगंधी म्हणाली, "राणी भंगीण कचरा न्यायला येईल तर माझ्या ह्या राजाला सुद्धां वरोवर घेऊन जाईल."

परत एकदां नोकदार व तिखट असं हास्य तिच्या ओठांवर आलं. जणूं ती ओंठावर चाकू वा सुरीची धार लावीत होती.

मोठ्या मुष्किलीनं माधवनं स्मित केलं. मग हंसला ; हीः हीः ही....

सुगंधीनं दुसरी पण फ्रेम ओढून काढली व खिडकीवाहेर फेंकून दिली. "ह्या साल्याचं इथं काय काम आहे ?... भोंड्या चेहऱ्याचा कुणी माणूस इथं राहणार नाही– काय माधव ?"

मोठ्या मुष्किलीनं माधव परत हंसला – हीः हीः ही ! एका हातांत सुगंधीनं पगडी घातलेल्याचा फोटो काढला व दुसरा हात माधवचा फोटो असलेल्या फ्रेमकडं वळवला. माधव तर जागीच गोठला, जसा कांहीं हात त्यांच्याकडेच येत आहे ? क्षणांतच फ्रेमसकट खिळासुद्धां सुगंधीच्या हातांत आला. जोरानं हंसून तिनं 'अुंऽहुं' केलं व दोन्ही फोटो खिडकीवाहेर टाकून दिले. दोन माळ्यांवरून फोटो खालीं आदळला व कांचा फुटण्याचा आवाज आला तेव्हां कांहीं आपल्या आंतच चक्काचूर होत असल्याचं माधवला वाटलं. मोठ्या मुष्किलीनं हंसून तो म्हणाला, "छान केलंस !...मला पण हा फोटो आवडत नव्हता."

हळुंहळूं सुगंधी माधवजवळ आली व सांगूं लागली, "तुला हा फोटो पसंत नव्हता.... पण मी म्हणते, दुसऱ्यांनी तुला पसंत करावं असं तुजजवळ आहेच काय? हें तुझं पकोड्यासारखं नाक, केसानं झांकलेलं कपाळ, सुजल्यासारख्या तुझ्या नाकपुड्या, तुझे मुडपलेले कान, तुझ्या तोंडाचा येणारा वास, ही तुझ्या देहावरची घाण ?... तुला आपला फोटो पसंत नव्हता. उंऽहुं...! कां पसंत असेल, तुझीं पापं त्यांत लपलेलीं होतीं तीं... आजचं जगच हें असं आहे...."

माधव मागं सरकत होता. शेवटीं भितीला टेकला तेव्हां आपल्या आवाजांत उसनं अवसान आणून तो म्हणाला, "वघ सुगंधी, मला वाटतंय कीं परत तूं आपला धंदा सुरूं केलाय. आतां तुला अगदीं शेवटचं सांगतों......"

पण सुगंधीनं त्याला मधेंच रोखून त्याच्या आवाजाची नक्कल करायला सुरुवात केली, "जर तूं परत धंदा करायला सुरुवात केलीस तर वस ! संपलें तुझे-माझे संबंध. तूं जर आपल्या इथं कुणाला ठेवून घेतलंस तर वेणी धरून तुला वाहेर काढीन...ह्या महिन्याचा तुझा खर्च, पुण्याला जातांच मी पाठवून देईन... हो, काय भाडं आहे तुझ्या ह्या खोलीचं ?" माधव अगदी चूप होता. पण सुगंधी थांवली नाहीं. "मी सांगितलें, पंधरा रुपये आहे भाडं ह्या खोलीचं.... आणि दहा रुपये भाडं आहे माझं...आणि जसं तुला ठाऊकच आहे, कीं अडीच रुपये जातात दलालाला. वाकी राहिलेत साडेसात, उरलेत न साडे-सात? ह्या साडेसातांत मी तुला ती वस्तू द्यायचं कबूल केलं होतं कीं, जी मी देऊंच शकत नव्हती आणि तूं अशी वस्तू घ्यायला आला होतास कीं जी तूं घेऊं शकत नव्हतास.... तुझा माझा संबंधच काय होता ? कांहींहि नाहीं ; वस, हे दहा रुपयेच तर तुझ्यामाझ्यांत वाजत होते, अन् आपण दोघांनीं मिळून अशा गोष्टी केल्यात कीं तुला माझी आवश्यकता वाटायला लागली व मला तुझी आवश्यकता हवी अशी वाटूं लागली. तेव्हां तुझ्या माझ्यांत दहा रुपये वाजत होते व आतां पन्नास वाजताहेत. तूं पण त्यांचा आवाज ऐकतो आहेस अन् मीहि...हा तूं आपल्या केसांचा काय सत्यानश सुरू केला आहेस ?"

सुगंधीनं असं म्हणून बोटानं माधवची टोपी एका वाजूला उडवून दिली. संतापानं तो कांपायला लागला. जोरानं तो म्हणाला, "सुगंधी !"

सुगंधीनं माधवच्या खिशांतला रुमाल काढला अन् त्याचा वास घेऊन फेकून दिला. "ही कापडं ह्या चिंध्या.. ऑफ् ! किती घाणेरडा वास येतो आहे. उचलून बाहेर टाक तें."

माधव ओरडला, "सुगंधी !"

करड्या सुरांत सुगंधी म्हणाली, "सुगंधी के वच्चे, तूं आलास कशाला इथं ?....तुझी आई राहतेय हो इथं तुला पन्नास रुपये द्यायला ? कीं तूं मोठा असा साजिदा लागला आहेस मी तुझ्यावर भाळायला ? कुत्ते, कमीने, माझ्यावर राग करतोयस ? मी तुझी दवेल आहे काय ?... भिखमंगे, तूं आपल्याला काय समजतो आहेस ?... मी विचारते की तूं आहेस कोण ?.... चोर की खिसेकापू ?.... ह्या वेळेला माझ्या घरांत तूं काय करायला आला आहेस ? वोलवूं पोलिसला...." पुण्यांत तुझ्यावर केस असो-नसो, इथं तर तुझ्याविरुद्ध एक केस उभी करतेंच..."

"तेरी माँ का सिर... कोण होतोस तूं मला हें सारं विचारणारा ? भाग यहां से. नाहीं तर...."

सुगंधीचा चढलेला आवाज ऐकून, सुकलेल्या चपलांवर तोंड ठेवून चिडचिडणारं तिचं खरेजलं कुत्रं खडवडून उठलं व माधवकडे तोंड करून भुंकूं लागलं. कुत्र्याच्या भुंकण्या पाठोपाठच सुगंधी जोर-जोरानं हंसायला लागली.

माधव भ्याला, आपली पडलेली टोपी घ्यायला तो वांकला, तसा सुगंधीचा गरजणारा आवाज त्याला ऐकूं आला, "खवरदार असूं दे ती तिथं... जा तूं पुण्याला पोंचतांच मी हिची मनिऑर्डर करून देईल." असं म्हणून ती जोरानं हंसली व हंसत हंसतंच खुर्चीवर वसली. तिच्या खरजेल्या कुत्र्यानं माधवला भुंकून भुंकून वाहेर घालवून दिलं. पायऱ्या चढून कुत्रं आपली शेपटी हलवीत सुगंधीजवळ आलं व तिच्या पायाशीं वसून आपले कान फडफडावूं लागलं, तशी सुगंधी दचकली. आपल्या चारी वाजूला भयानक शांतता असल्याचं तिला जाणवलं. अशी शांतता तिनं पूर्वीं कधींच अनुभवली नव्हती. कांहीं तरी अगदीं खालीं झाल्यासारखं तिला वाटलं. उतारूंना सोडून डब्बे शेडस्मधें खाली वाटतात तसंच. हा एकटेपणा सुगंधीला अगदी असह्य होऊं लागला. आपल्या मनाला समजावयाचा तिनं प्रयत्न केला, पण तो असफल ठरला. एकाच वेळेला अनेक विचार ती आपल्या डोक्यांत ठांसत होती. पण अगदी चाळणीगत झालं होतं. ती डोक्यांत विचार कोंबायची अन् ते चालल्यागत खाली गळायचे.

पुष्कळ वेळपर्यंत तीं खुर्चीवर वसून राहिली. खूप विचार करूनहि मनाला रमविण्याचं कुठलंच साधन तिला मिळालं नाहीं, तेव्हां तिनं आपल्या खरजेल्या कुत्र्यालाच उचलून कुशींत घेतलं व त्याला पलंगावर आपल्या सोबत घेऊन ती झोंपी गेली. ●●●






# अग्निमाता डोंगर

**—पूर्व कथासूत्र—**

**गांवांत कंपनी आली होती. तिचा असिस्टंट मॅनेजर विजय, अण्णा गुरुजींचा भाचा. दाजी नावरांची मुलगी त्याच्यावर प्रेम करूं लागते. पण तिनें त्याच्या जातीचा उल्लेख करताच दोघांत बेबनाव होतो. खाणींत मजुरांना मिळणारी वागणूक बघूनसुद्धां तो व्यथित झालेला असतो. माणुसकी सोडून गांव वागत असतं. अशा परिस्थितींत गांवांतील एका अल्पवयीन मुलीवर बलात्कार होतो. गांव पेटतें, घाटच्यांना गांवाबाहेर काढण्यासाठीं निदर्शनं सुरूं होतात. अशा परिस्थितींत दाजी नावर घाटच्यांच्या पाठीशीं उभे राहातात. गांवाविरुद्ध एकटेच. आणि मग त्याचे भाऊबंद त्याच्याविरुद्ध फिरतात. भांडणें वर्दळीवर येतात. अशांत आतेबाई आजारी पडतात. आणि मग....**

## [२२]

**वेंगुर्ल्याच्या** मिशन हॉस्पिटलमध्यें विजय दोन महिने पडला होता. आणि तिथून हा बरा होऊन गांवीं आला तेव्हां गांवांत लोकांनीं ओळखलंच नाहीं, इतका बदल झाला होता. उजवा पाय कापून काढावा लागला होता. काखेंत कुबडी, केस उलटे वळवलेले आणि दाढी राखलेली, अंगांत झब्बा-लेंगा— ह्या अशा वेशांतहि लोकांनीं कदाचित् विजयला ओळखलं असतं. पण त्याचा चेहरामोहरासुद्धां साफ पालटला होता. ओठावरचं मोकळं स्मित निमालं होतं. डोळ्यांतील मिस्किल झांक मावळली होती. पूर्वीचा हंसतमुख, उमद्या स्वभावाचा आणि प्रसन्न व्यक्तिमत्वाचा विजय हा नव्हता. त्या बिचाऱ्याचा मुडदा पडला होता त्या दिवशीं तिथं खाणीवर...हा तो नव्हताच ! ह्याची दृष्टि हिंस्र होती. खोल डोळ्यांत जखम होती. कपाळावर आंठ्या होत्या. चेहरा काळवंडलेला, मुद्रा तिरसट, पिसाट—

विजयबरोबर खुशाली होता.

ते दोघे तर उतरून ऐलथडीला आले, आणि पारावरून भाऊ कुळकर्ण्यानं खुशालीला साद घातली. विचारलं, "बऱ्हाडी कोण काढलेस रे ?"

"छा : ! भाऊ असं काय हो करतां ? आपले विजयसाहेब नाहींत हे !"

"हां !" भाऊ मोठ्यानं हुंकारला. टोपी काढून रुमालानं टाळूचा घाम पुसूं लागला.

विजय चार पावलं नाहीं गेला तर मागं भाऊ कुळकर्ण्याची नौबत झडूं लागली. मुद्दामच, मोठमोठ्यानं तो बोलूं लागला. "भांचोद ! खाज नाहीं निवलेली दिसत ह्याची ! अरे ह्याची आई, कमळी बरी—काय ? पोर वाढलं तशी रांड जी उडाली ती थेट तिकडे बॉम्बेला ! आणि रांडेचा हा— एक पाय मोडला तरी गांव सोडायला तयार नाही. लंगडत आला. काय ? अरे पण कशाला— मी म्हणतों ! भांचोद, किल्ला तर कधींच पडला. बालेकिल्लासुद्धां फोडला. हाः हाः हा...माझा द्वारकानाथ मर्द आहे. फुकट नाही खेपा टाकणार... त्या दाजी नावराकडे. आतां तो खुळा असतोच कुठं घरांत ? होयरे ...विचारा मला..."

मुष्किलीनं विजयनं स्वतःला आवरलं. त्या हलकट बोलण्याकडे दुर्लक्ष केलं. त्याला खिजवण्यासाठीं, चिडवण्यासाठीं तें सुरू झालं होतं. आणि म्हणूनच विजय चिडणार नव्हता. शरमेनं खालीं मान घालणार नव्हता.....ठार मुर्दाड चेहऱ्यानं तो चालूं लागला.

नाक्यावर खुशाली वसंत वापलाच्या दुकानांत शिरला. रस्त्यांत विजय एकटाच उभा होता. इकडे तिकडे बघत, एरव्ही त्याच्या लक्षांत कधीं आलं नव्हतं. गेल्या वर्ष सहामहिन्यांत ह्या नाक्यावर सुद्धां खूप उलथापालथ झाली होती. वरींच दुकानं उभीं झालीं होतीं. शिरोड्याला बाजरच्या रस्त्यावर होतीं तशीं. वसंत वापलाच्या

**श्रीराम कामत**

दुकानाचा पसारा वाढला होता. झुंबड गर्दी उडाली होती. तरी गिऱ्हाईकांना टाकून दुकानचीं माणसं विजयला बघत होतीं. तलावड्याच्या विश्रान्तिगृहांत काचेचीं कपाटं आणि मुंबई फॅशनच्या टेबल खुर्च्या आल्या होत्या. बाहेर धगधगत्या शेगडीसमोर घाम गाळत राजी तानावडे भजीं तळत बसला होता. कढईंत नुसताच झारा परतीत राजी विजयकडे बघत राहिला. आंत लोकं बोंब मारीत होतीं. तर हा उलट तडकला, "भजीं होतायत ! झालीं कीं मिळतील. कच्चीं नाहीं घालणार. उद्यां हगवण लागली कीं बोंवलत बसाल तानावड्यांचीं भजीं बाधलीं." पलिकडे पिठाच्या दोन गिरणी फकफकत होत्या. इकडे लायनी लागल्या होत्या. घाटी लोकंच बहुतेक, माकऱ्या खाणारीं. बाकी सगळीं छोटीं दुकानं— केस कापण्याचीं शापं, शिंप्यांचीं दुकानं, धोब्यांचीं खोपटं. बाहेर पाट्या मात्र झॅक्—'सन लाइट', 'स्वान', 'जय महाराष्ट्र' वगैरे, वगैरे. कामं टाकून पुढं दारांत येऊन लोकं उभीं होतीं. तिरकस नजरेनं ह्या विजयकडे बघत होतीं. कोण बुवा हा लंगडा दाढीवाला, म्हणून प्रश्नार्थक चेहऱ्यानं एकमेकांकडे पहात होतीं. खालच्या आवाजांत कुजबुजत होतीं. ते आंबट डोळे, लांबट चेहरे, खवचट कुजबुज— भरनाक्यावर रस्त्यांत एकटं उभं राहणं साधी गोष्ट नाहीं. विशेषतः

खेड्यांत, जिथं लोकांना गांवापरती दृष्टि नसते, सृष्टि नसते– आणि मग मोठं अवघड होऊन बसतं !

खुशाली लवकर परतण्याचीं चिन्हं दिसत नव्हतीं. वसंत वापलानं मुद्दामच त्याला अडवून धरलं होता. तशींच कांहीं खास बोलणीं चाललीं असावींत !

इतक्यांत दाजी नावर वहाणा वाजवीत तरातरा रस्त्यानं आला. डोक्याला खादीची टोपी, अंगांत ठेवणींतला कोट, हातांत छत्री– पोशाखावरून तरी स्वारी बाहेरगांवीं, कमींत कमी शिरोड्याच्या पुढं, जात असावी असा तर्क करावयास हरकत नव्हती.

तो जवळ आला तसं वसंत वापलानं हटकलं, "दाजी–"

दाजीला एकदम आठवण झाली. तो थांबला नाहींच. चालतां चालतां ओरडून म्हणाला, "आहे रे ध्यानांत. निघालों आहे वेंगुर्ल्याला. परत आल्यावर सगळी बाकी एकरकमी चुकती करून टाकतों. नाहींतरी तीन महिने सवड खालीस– आत्तां आणखी एक आठ दिवस."

"बाकी एकदा जमिनीचा लिलांव झाला का मग पैशाला तोटा नाहीं तुम्हाला दाजी." वसंत वापलानं म्हटलं, पण ताणून घ्या जरा ! जमिनीला चांगला भाव मिळायला हवा कंपनीकडून...फुकट हातची जमीन घालवलीत."

"वसंता, अरे आणि तुला मी शहाणा समजत होतों. आबाची ही इस्टेट आबा गेल्यावर वांटण्या झालेल्याच नाहींत"– दाजीनं माहिती दिली. जुनीच, उभ्या गांवाला ठाऊक असलेली.

त्यावर दुकानदारानं मत दिलं, "पण बाराहून अधिक वर्षं तुमच्याकडे वहिवाट होती. कूळकायद्यानं—"

"कूळ नव्हे, खूळकायदा. त्याला फाजील महत्त्व देऊन माणुसकी सोडू होय रे मी ?"

"मग सगळीच इस्टेट भावांना करायची होती दान ! लिलांवाचा हा घोळ आणिक कशाला हवा होता ? वसंत वापलानं छेडलं.

दाजी नावरानं एक दीर्घ उसासा टाकला. हताश स्वरांत म्हटलं, "तेंच करणार होतों वसंता ! पण भांचोद, ह्यांनी जमीन कंपनीच्या ताब्यांत दिली असती. साठ रुपयांच्या रॉयल्टीसाठीं. माझीं हापूसचीं कलमं कंपनीवाल्यांनीं ट्रॅक्टरनं सपाट केलीं असतीं."

"नाहीं. तरी–"

"नाहींतरी काय नाहींतरी–" दाजी एकदम खवळला, "दुनियेंत सगळेच नालायक नाहींत तुमच्यासारखे ! लाचार नाहींत ! मोठीं माणसंसुद्धां आहेत. ह्यांचीं पत्रं येतायत् मला पण जाऊं दे ! आजच बोलत नाहीं. लिलावांच्या वेळीं दिसेलच. माझा भीष्म कंपनीला नाहीं मिळणार. काय वाटेल तें करा– डोंगरावर आमराईच उठणार–"

आणि पाठ फिरवून दाजी चालूं लागला.

समोर रस्त्यांत उभ्या असलेल्या विजयलाच दाजी आदळणार होता. पण विजय सावध, आधींच बाजूला झाला. आणि तसं दाजीचं ह्या लंगड्या दाढीवाल्याकडे लक्ष गेलं.

कपाळ !

"दाजी, तुम्ही ओळखलं नाहीं मला. विजय मी, विजय शिर्के–" विजयनं ओळख दिली.

"काय? बरा आहेस ना बाबा ?" दाजीनं विचारलं

"हो !" विजय हंसून म्हणाला, तेव्हां पाय काढावा लागला. तैमूरलंग झालों

"उत्तम" दाजी आपल्याच नादांत होता, "काय झालं होतं म्हणालास ? ट्यूमर-लंगमध्यें ? आमच्या हिला पण डॉक्टर तोच सस्पेक्ट करीत आहेत. ऑपरेशन आहे उद्यां तिकडेच निघालों आहे. वेंगुर्ल्याला, मिशन हॉस्पिटलांत"

"ओह्हो ! सॉरी यंग मॅन ! चार दिवस लक्ष ठेव आमच्या घराकडे. घर पोरांवर टाकून जातों आहे. द्वारक्या आहे म्हणा– द्वारकानाथ कुळकर्णी. म्हणाला आहे खरा– काळजी करूं नका ! मी आहे. पण माझ्यासारखाच तो– उद्योगी. घरांत कुचकामाचा–" असं तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत दाजी वाटेला लागला.

नाक्यावर लोकांना मात्र हंसू आवरेना. त्या दाजी नावराला काय म्हणावं कळेना ! लंगड्या दाढीवाल्याची आतां त्यांना ओळख मिळाली. आणि मग लोकांच्या नजरा बोलक्या झाल्या. कुजबुज वाचाळ झाली, "अरे आला–हा कमळीचा पोर ! गांवांत परत आला– बाकी गडी हिंमतवाज खरा, पक्का जिद्दीचा दिसतो. दुसरा कोणी असता तर तोंड काळं करून गेला असता. पण हा मात्र आला, परत आला. लंगडा होऊन, दाढी वाढवून. मले शाब्बास ! मजा येईल आतां ! एक लिलांव होणारच आहे. डोंगरावर दाजी नावराच्या जमिनीचा हा दुसरा– त्याच्याच लेकीचा....काय ? हाः हाः...."

हें असं काही बाही लोकं बोलूं लागलीं. तोंडाला येईल तें. आणि ह्यांचं तोंड कोण धरणार ?

विजयनं उद्वेगानं खुशालीला म्हटलं, "मी होतों रे पुढं. आतां इथं अधिक उभं रहाणं शक्य नाहीं."

पण दाजी नावराचं तोंड वाजलेलं ऐकलं म्हणून विजय थांबला. बघूं लागला.

होय, दाजी नावरच होता. तरीपर्यंतसुद्धां पोहोंचला नाहीं आणि त्याला परतावं लागलं होतं. वेंगुर्ल्याला जायचं कारणच नव्हतं. स्वतः आत्तेबाईचं हंसतं समोर हजर झाली.

रस्त्यानं दाजी सहकुटुंब गहजब करीत येत होता, "म्हातारी पळाली रे ! उद्यां ऑपरेशन, तर आज पळ काढला हॉस्पिटलांतून."

'हात धरून नाहीं गेलें कोणाचा ? आलें माझ्याच घरांत– मरायला." आतेबाई नवऱ्यापेक्षां आवाज चढवून म्हणाली.

"खरं ! डॉक्टरनं सांगितलंच आहे, ऑपरेशन केलं नाहींस, तर आत्तेबाई तुझं आयुष्य सहा महिन्यांहून अधिक नाहीं." दाजी नावर उसळला होता.

"ऑपरेशन करून हास्पिटलांत मरणार ती हिथं घरांत सुखानं मरेन मी. शिवाय भंग्यामांगांचा विटाळ पण नको. हास्पिटलांत जळ्ळी कोणीहि माणसं असतात."

"मरा मग ! पोरं बसतील रडत—" दाजी फडफडत होता.

"नाहीं सवड मला. हा लिलांव आहे ना– तुमचं कर्म ! आधीं तें निस्तरतें –"

समोर विजयला पाहिलं आणि आत्तेबाई बोलतां बोलतां थांबली. तिच्या तळपायाची आग उडाली. अंगणांत बैल शिरलेला दिसला कीं जशी त्याच्यामागं आक्रान्तानं ओरडत सुटे तशीच ती ओरडली, "मेल्या, कां आलास परत ? कशाला– ह्या गांवांत तुझं काम नाहीं ! नीघ, नीघ– हो चालता !"

गांवांत दुसऱ्या कोणी नाहीं, पण आत्तेबाईनं मात्र विजयला पाहिल्याबरोबर ओळखला होता.








# [२३]

**संध्याकाळचा** येऊन डॉक्टर इंजेक्शन टोंचून जायचा. कसलंसं झोपेचं, गुंगीचं.

आणि हें शरीरांत भिनूं लागलं कीं मग आतेबाईची तडफड हळुहळू कमी होत जाई. गात्रं आस्ते आस्ते बधीर होत. अवयव एकेक सुन्न होऊं लागत. देह, मातीचा गोळा कसा थलथलीत अन् लिबलिबीत होऊन पडे. पापण्या अर्धवट मिटलेल्या, आंत बुबुळं जड होऊन बाहेर पडूं बघत. तोंड उघडंच राही. आणि मग श्वासोश्वाससुध्दां तोंडानंच चालू व्हायचा. सरळ नाहीं. कधी स्पष्ट, जोरजोरानं. कधी इतका मंद कीं भीति वाटावी, शंका यावी आणि गुंगींत्च मग आतेबाई वरळूं लागे. आंतल्या खोल, फटपटीत आवाजांत. कशाचा कांहीं संबंध असूं नये, अर्थ लागूं नये असं भलभलतं कांहींतरीच.

वासंतीच्या काळजाचं पाणी पाणी व्हावं. आईची ही अवस्था मात्र उघडया डोळयांनीं तिला बघवत नसे. रडूं कोसळें, डोळयांतून पाण्याची धार लागे.

"असं काय करतेस ग आई?" तिचं सारखं चालू असायचं.

तरी ठाऊक असायचं, आतेबाई गुंगींत आहे. आणि उद्यां पहाटेपर्यंत शुद्धीवर येणार नाहीं.

पण ही गोष्ट वासंतीच्या मुळीं लक्षांतच राहूं नये इतकं मन ताणलेलं असे, म्हणून जाई.

गळयाला धोंडा बांधून जीव देण्याच्या विचारांत विहिरीवर उभ्या असलेल्या बाईसारखी भकास अन् हताश चेहऱ्यानं ती वावरे. डबडबलेल्या डोळयांपुढं काळोख दिसायचा फक्त. मिट्ट काळोख, थंड, गोठलेला. विहिरींत खोल तळाशीं असतो तसा. माजघरांत मध्यभागीं टेबलावर चिमणी भगभगत असायची. पण हिला मात्र काजवेच दिसत. आणि अंगावर वेडकं उडया मारताहेत असा भास होई. आणि वाटे मासे लचके तोडताहेत—शरीराचे, तिच्या आईच्या—तिच्यासुध्दां.



समुद्रांत वाहून आलेला एक मुडदा वासंतीनं लहानपणीं पाहिला होता. बिचारी होती कोणीतरी अशीच एक बाई. चारपांच दिवस पाण्यांत राहिल्यानं प्रेत भलं तट्ट फुगलं होतं. माशांनीं ठिकठिकाणीं लचके तोडून तें पार विद्रुप केलं होतं. डोळे, नाक, कान, बोटं—काहीं उरलंच नव्हतं. आणि खालीं पोटाची तर पार चिरफाड झाली होती. कोथळा न् आंतडीं बाहेर निघालीं होतीं. छीः ! बघूनच तिच्या अंगावर कांटा आला होता. चार दिवस अन्नावरची इच्छाच उडाली होती. पोटांत ढवळून यायचं, जाम ओकारी आल्यासारखं व्हायचं.

कारण नव्हतं आणि तरीही चिमणीच्या सांडत्या उजेडांत आईच्या शुष्क, जर्जर चेहऱ्याकडे पाहिलं कीं—इतक्या वर्षांची ती आठवण तिच्या विस्कटलेल्या मनांत घरटं करूं लागे. थोडक्यांत, तेव्हां झालेले आणि करून घेतलेले बरेवाईट समज आणि उमज अंड्यांतून बाहेर पडत चिलकूं लागत. ह्या विचारांनींच वासंतीचं डोकं गरगरूं लागे. भोवळ आल्यासारखं होई तिला. आणि मग शिशाचा जड गोळा पोटांत घरंगळूं लागे. जीव गुदमरूं लागे, उचंबळून येई. दोन्ही हातांनी तोंड झांकून घेऊन ती हमसाहमशी रडत बसे. कधीं कधीं तर रात्रभर......

तिचंच पाप तिला भोवूं लागलं होतं. आणि आतां सुटका नव्हती.

आई अशी आजारी पडली नसती तर—?

आणि आई गेल्यावर—?

पहाटे शुद्ध आली कीं आतेबाईची पहिली साद लेकीला असे, "वच्छी, वच्छी तस्त." वच्छी दिवा मोठा करून तस्त पुढं करीपर्यंत हिचं तोंड सुरू व्हायचं, "हें परस्वाधीनं जिणं ! नको, नको रे देवा ! सोडीव ह्यांतून ! ह्या जल्मीं कांहीं नाहीं, पण गेल्या जल्मीचें पाप दिसतं. भोगतें आहे. होय, होय ग वच्छी !"

वासंतीच्या सुजलेल्या डोळयांकडे लक्ष गेलं कीं आतेबाई उसळून म्हणे, "कां ग रडतेस तूं ? नाहीं मरत मी. अजून खूप जगणार आहे."

आईच्या ह्या वाक्यानं वासंतीला खूप बरं वाटे. तिचा धीर दुणावून जाई.

कामाला ती डरत नव्हती. वेंगुर्ल्याच्या मिशनच्या हॉस्पिटलांत नर्सला झेपणार नाहीं अशी सेवा ही पोर करीत होती आतेबाईची. हगलींमुतलीं तस्तं साफ करीत होती. घाणीचीं लुगडीं अन् कपडे धूत होती. औषधपाणी क्रमं अगदी वेळेवर. आतेबाईचा स्वभाव नाहीं तरी हट्टीच, त्यांत हें जिवावरचं दुखणं. आईची तैनात संभाळता संभाळता लेकीचा जीव नको होई. तशांत घरकामाला गांवांत मोलकरीण सांपडेनाशी झाली होती. बाप्ये लोक वर खाणींत कामाला जाऊं लागले तसा घरांत बायकांना माज चढला होता. दुसऱ्यांच्या घरीं भांडीकुंडी करणं अपमानाचं वाटूं लागलं होतं. विचारलं तर त्या म्हणत, "दुसऱ्यांकडे वावर कोण करील ताई ? आं! कारभाऱ्याला पसंत नाही." आणि ह्यांच्या नडीनिकडीला आतेबाई मात्र सर्व प्रकारची मदत करायची. हातांत पैसा खेळूं लागला तशी गांवचीं लोकं आतेबाईचं हें ऋण विसरलीं होतीं, हेंच खरं ! वासंतीला एकएक अनुभव येत होता. एव्हढीशी पोर ! जबाबदारीचा अनुभव तिला थोडाच होता. दुःख, चिन्ता, काळजी—शब्दच ठाऊक!










वाचून, ऐकून, झालंच तर दुसऱ्याचं वघून. प्रत्यक्षांत हें सगळं पोर आज अनुभवीत होती. प्रथमच आणि तेंसुध्दां हें असं—आभाळ फाटल्या-सारखं झालं होतं. घर कोसळत होतं. वासंती भेदरली नाहीं, वावरली नाहीं. नाहींतरी प्रसंगाला माणूस आपोआप सज्ज होतं. जवावदारी पडली कीं मन घण खायलाहि तयार होतं. दाजी नावराच्या घरांत आज तिच्यावरच जवावदारी पडली होती. कर्तीसवर्ती आतेवाई अंथरूणाला खिळली होती. स्वतः दाजीला आपल्या घराची विलकुल फिकीर नव्हती. आणि कान्ता लहान होता, अजाण होता.

पोरीची कमाल हो ह्या आतेवाईच्या! आई मरणाची शिक, पण कुठं नाहीं कमी पडूं दिलेलं. दाजीचं घर कसं वाकी झॅक् ठेवल आहे. गुणाची आहे पोर — मोठी गुणाची! — गांव वासंतीचं कौतुक करून राहिलं होतं. तर एक दिवस ही गेली खाणीवर आणि कर्म करून घेतलन् आणि गांवाला भिऊन मग विचाऱ्या विजयचांच वळी देऊन वसली. पदर झाडून चट् मोकळी! वासंतीला वाटलं निभावलं. तिला काय माहित? हें लोकमत म्हणजे वळीवाचं वारं! कधीं उलट जोर करोल आणि आग पखिडूं लागेल कळणारसुध्दां नाहीं. तेंच झालं. ह्या असल्या गोष्टींना गांवांत भलतंच महत्त्व. तशांत वामगाच्या पोरीचं लफडं म्हणजे पर्वणीच. लोकं खाजगींत वरच्या आवाजांत वोलूं लागली. ह्या दाजी नावराच्या लेकीचे चाळे रानांत वऱ्यांच लोकांनी पाहिले होते. इतके दिवस गप्प वसले, वोलले नाहींत. पण कहर झाला होता. तेव्हा खरी गोष्ट वोलणं ह्यांना भागच होतं. मिटक्या मारीत हीं लोकं वर्णन करूं लागलीं. खाणीवरचीं लोकं—घाटीच अधिक. त्यांच्या विजयसाहेवाचं ह्या पोरटीपायीं वाटोळं झालं होतं. होय, पक्की वाजिंदी, छिनाल वया ही! त्यानां ठाऊक होतं. एरव्हीं प्राण गेला तरी वोलले नसते. पण तेच कंठावर हात ठेऊन शपथेवर वोंवलत सुठले, "देवाशप्पथ दादा! अहो, विचारा आम्हाला."

मुक्या घाटचांना कंठ फुटला होता. कधीं नाहीं तें गांवांत लोकं त्यांचं ऐकून घेऊं लागलीं होतीं. वासंतीविरुद्ध गांवांत रान उठलं होतं.

दाजी नावराचीच लेक ती. तिनं पर्वा नाहीं केली. दखल नाहीं घेतली. आणि लक्ष द्यायला फुरसद होतीच कुठं? सगळा वेळ आणि अक्कल अजारी आईची सेवा करण्यांत आणि समजूत घालण्यांत कामी येई. अरतीपरती दुसरा विचारदेखील डोक्यांत येत नसे.

कान्तानं मात्र वैताग आणलान् होता. संध्याकाळीं शाळेंतून घरीं परते तो धुळीनं माखलेल्या कपडयांनी. वह्या पुस्तकं फाटलेलीं, मारानं आणि मानहानीनं काळवंडलेलं तोंड. रोजचं झालं होतं. अशा स्थितींत त्याच्याकडे वघायचीसुध्दां सोय नव्हती. वाहेर ओटीवरच कान्ता गळा काढून वसे. वरोवरचीं पोरं त्याला चिडवीत. त्याच्या ताईला नाहीं तें घाणेरडं वोलत.

"अरे, लक्ष देऊं नये आपण" वासंतीनं भावाला मार्ग दाखवला.

"शहाणीच आहेस! अब्रू जाते आमची! तुला काय—"

"हूं! जाईना अब्रू! विनाकारण तूं कितीं दिवस मार खाणार?"

"मरेपर्यंत" कान्ता खवळून म्हणे, "काय करूं ग ताई? वाकीच्यां-सारखीं मला नाहीं मारामारी करतां येत मी... मी वावळट आहे.

वासंती निरुत्तर होऊन कान्ताकडे वघत राही. विषादानं, असहा-य्यपणं.

द्वारकानाथ कुळकर्णी एक दिवस माजघरांत आतेवाईकडे वसला होता, तर वाटतं वाहेर चाललेला हा भावावहिणीचा संवाद त्याच्या कानीं गेला. त्याक्षणीं तरी तो काहीं वोलला नाहीं. चुप्पच राहिला.

दुसऱ्या दिवशीं शाळेला चालला होता तर वाटेंत तरीवर द्वारकानाथ कुळकर्ण्यानं कान्ताला साद घातली. गांवातून शिरोडयाला शाळेंत जाणारीं सर्व पोरं त्यानं रोखून ठेवलीं होतीं. कांठावर तीं रांगेंत उभीं होतीं. द्वारकानाथाच्या हातांत हंटर होता. त्यानं कान्ताला विचारलं, "वोल तुझ्या ताईवद्दल कोण कोण काय वोलतात?"

कान्ता गांगरला, वावरला. म्हणजे द्वारकानाथ असा भलताच प्रश्न करील याची त्याला कल्पना नव्हती. तो वघतच राहिला द्वारक्याकडे आणि मग या पोरांकडे. सगळे-सगळे होते—तिथं समोर, रांगेंत खालीं माना घालून. द्वारकानाथचा वाकटा भाऊ गुरु, वाळया-काकांचा मधू—हे दोघे तर त्याचे खरे वैरी. भारी त्रास देत, आणि तो चिडला कीं अंगावर येत, मारामारी सुरु करीत. वाकी पोरं त्यांना साथ देत.

द्वारक्यानं पुन्हा वजावलं, "अरे, नांव सांग! नको घावरुस—"

गुरू आणि मधू तर एकदम गरीव झाले होते. दीन वापुडयाच्या नजरेनं कान्ता वघत होते. कान्ता संभ्रमांत पडला.

आणि डोळे मिटून त्यानं नांवं घेतलीं, "रामा कांवळी, मंगू रेडकर, वासु परव—"

"अरे देवा! कान्ता, आम्हीं कधींतरी तुझ्या कळीला गेलों काय रे? कां उगाच नांव घेतोस?" हीं पोरं ओरडलीं. त्यांतल्या त्यांत गरीव आणि सालस पोरं हींच होतीं. कान्तानं नेमकी त्यांचीं नांव घेतली होतीं.

"नाहीं जात? उत्तम! पण कधीं गेला-विलांत तर याद राहील!" असं दरडावीत द्वारकानाथ कुळकर्ण्यानं ह्या पोरांवर हंटर उडवायला सुरवात केली.....

हा प्रकार वासंतीला कळला तेव्हां तिचा ऊर कृतज्ञतेनं भारावला, उपकाराच्या ओझ्यानं घड फुटलेल्या केळीसारखीं ती लवलवली, लडवडली.

(क्रमशः)






- शपथ
- वनहंसी
- लोकसाहित्य भाषा आणि संस्कृति

## कस अजून कायम आहे

**अरविंद** गोखल्यांनी आतांपर्यंत वीस कथासंग्रहांची मर्यादा ओलांडली आहे. 'शपथ' हा कथासंग्रह वाचल्यावर प्रथम जाणवणारी गोष्ट म्हणजे लेखकाची अनुभवसंपन्नता. या संग्रहांत समाविष्ट केलेल्या वारा कथांत वेगवेगळ्या अनुभवांचें प्रत्ययकारी दर्शन होतें. गोखल्यांच्या कथेचा कस अजूनहि कायम आहे. तिच्यांत साचेबंदपणा वा एकसूरीपणा अजूनहि आलेला नाही हें तिचें ठळक वैशिष्ट्य. कधीं कधीं हा अनुभव एखाद्या व्यक्तिचित्राचें रूप धारण करतो, तर कधीं कधीं विशिष्ट अनुभवाच्या प्रतिक्रियांची मनावर झालेली नोंद करून लेखक पुढें जातो, कधीं कधीं अनुभवांतील नाटच तो टिपतो, तर कधीं कधीं नाटचात्मकता व कल्पकतेचें मिश्रण करतो.

वर सांगितल्याप्रमाणें भिन्न रूपें धारण करणारी गोखल्यांची कथा निवेदनाच्या आधारावर वरची पातळी गांठते. कांहीं कथा तर केवळ वातावरणाला महत्त्व देऊन निवेदन सामर्थ्यावर उभारलेल्या दिसून येतात. उदा. 'कोमट दुपार', 'भिरभिर', 'सीमारेषा' इ.

कथाकार गोखल्यांच्या प्रतिभेला नाटचात्मकतेचे वेड आहे. 'शपथ' कथेंतील हृषिकेशच्या पत्नीचा मृत्यु, अंबिकेची शपथ, 'अभिराम'मधील गजाननाला मिळालेला वाडा, इ. प्रसंगांतील नाटच हा त्या संबंधित कथांचा गाभा. ही नाटचात्मकता कथेला यश मिळवून देण्यास मदत करते. केव्हां केव्हां कल्पकतेचा धागा घेऊन ही नाटचात्मकता गोखल्यांच्या कथेंत अवतरते. केशर वर्देचा काल्पनिक प्रियकर, नानासाहेब पिंगळ्यांचा वाडा अचानकपणें गजाननाला मिळणें, आजोळीं जाऊन आपल्या गांवचे दगड निरनिराळ्या ठिकाणी फेंकून देणें ही नंदाची कल्पना (पुरचुंडी), 'शपथ'ची कथावस्तु; इ. घटनांत कल्पकता व नाटच ही हातांत हात घालून वावरतांना दिसतात; पण यामुळें एखादा अनुभव काल्पनिक तर ठरूं पाहत नाहीं ना अशी भीति वाटूं लागते. 'शोध' ही कथा या दोहोंच्या मिश्रणाचें एक उत्कृष्ट उदाहरण. ही कथा वाचकाच्या मनाची पकड तर घेतेच आणि त्याला विस्मित पण करते. अनेक दृष्टींनी ही कथा एक वरच्या दर्जाची कथा ठरते. हरविलेला मुलगा (रवि) सांपडावा म्हणून अन्नपाणी वर्ज्य करणारी पत्नी चार वर्षानंतर तो मेला आहे असें समजतांच दुःख विसरून पुन्हां 'माणसांत' येते, नानांच्या खोट्या सांगण्याला फसते. तीन चार वर्षांपूर्वी पळवून नेलेलें मूल पोलिसांनीं मिळवलं आहे असें अचानकपणें एके दिवशीं नानांना समजतांच ते कासावीस होतात, हतबुद्ध होतात. त्यांना वाटते तो रवि नसला तर आपला डाव फसेल. पुन्हां पत्नी एकांत धारण करील. पण जर तो 'रवि'च असला तर — पुढचा विचार ते करूंच शकत नाहींत "रवि, माझ्या बाळा" असें म्हणत ते अंधारातच उघडे बोडके धांवत सुटतात. या ठिकाणीं झालेली नानांची कुअवस्था श्रेष्ठ कलात्मक मूल्य धारण करते. नाटच आणि कल्पकता यांच्यावर आधारभूत असलेल्या 'शपथ', 'अभिराम' यापेक्षां 'शोध' ही कथा वरच्या दर्जाची ठरते ती यामुळेंच! तसेंच ती एका वास्तव अनुभवाचें दर्शन पण घडविते.

'शपथ' संग्रहांतील अनेक पात्रें ही कोंडमारा झालेली पात्रें आहेत. अबू झालेले आबा (ओशाळा) मुलीकडे राहायला संकोचतात तर अमेरिकेहून पी. एच्. डी. घेऊन आलेला जगदीश (वनवासी) इथल्या वातावरणांत कोमेजून जातो. 'आसक्ति'मधील 'वाई,' 'भिरभिर'मधील 'वेडा', 'केशर वर्दे'-मधील अविवाहित मास्तरणी ही कोंडमारा झालेली आणखी कांहीं माणसें गोखल्यांच्या प्रभावी निवेदनामुळें या पात्रांच्या अन्तर्मनाचे कंगोरे अधिक टोंकदार बनतात.

लेखक ज्याप्रमाणें भिन्न थरांतील व्यक्तींच्या मनाचे पदर उलगडतो तसेंच मुलांच्या अन्तर्मनाचा वेध पण घेतो. 'पुरचुंडी' मधील नंदा स्वतःच्या गांवचे दगड आजोळीं नेऊन निरनिराळ्या ठिकाणी फेंकण्याचे ठरवितो तर 'आसक्ति'मधील नातवंडे (चंदू, मन्या, शोभा) आजीचा सहवास मिळावा म्हणून परस्परांचा द्वेष करतात. 'पुरचुंडी'मधील मनोविश्लेषणाला कल्पकतेची डूब आहे तर 'आसक्ति'मधील विश्लेषण अधिक मनोवेधक!

'उजळमाथा' ही एक अपरिचित अनुभव व्यक्त करणारी कथा. बुडणाऱ्या म्हातारीला वांचविणाऱ्या लेखकावर केतकी काळे आठ वर्षे प्रेम करते. अर्थात् ते लेखकाच्या नकळत. तिचें लग्न निश्चित झाल्यावर एके दिवशीं ती लेखकाकडे येते. लग्नाला पंधरा दिवसांचाच अवधी असतो. म्हातारीला जीवदान देणाऱ्या माणसासाठीं एखाद्या मुलीनें जीव ओवाळून टाकावा ही तिची कल्पना. त्याच्या पौरुषाचे सार्थक करण्यासाठीं कुणी स्त्रीनें आपलें स्त्रीत्व दिले पाहिजे ही तिची मनोमन भावना. आणि म्हणून ती आपलें शरीर त्याला देऊं इच्छिते. वेळ न मिळाल्यामुळें ही तिची इच्छा अपुरी राहते. ती पुढें कधीतरी पुरी करण्याचें आश्वासन त्याला देते. खरें म्हणजे स्वतःची इच्छाच प्रदर्शित करते. या कथेच्या गुंफणींत पूर्वी दर्शविल्याप्रमाणें निवेदनाचा प्रभावीपणा आहे—नाटचात्मकता व कल्पकता यांचें मिश्रण आहे. एक वेगळा अनुभव म्हणून ती आकर्षक वाटली तरी अस्सलपणाच्या व सच्चेपणाच्या दृष्टीनें ती कमजोर ठरते!

'सीमारेषा' ही या संग्रहांतील सर्वांत लहान कथा. स्मशानांत गेल्यावर मनावर झालेल्या प्रतिक्रियांची नोंद लेखक करतो. ओलेती नवोढा पाहिल्यावर अक्षर जीवन व मृत्यु यांच्यांतील सीमारेषा स्पष्ट होते.

'शपथ' संग्रहांतील या बारा कथा वाचल्यावर असें म्हणावेंसे वाटतें कीं, गोखल्यांच्या कथेचा कस अजून कायम आहे आणि घाटदारपणा सुद्धा!

**—प्रा. वि. शं. चौघुले**

**शपथ**

( ले. **अरविंद गोखले**, प्रकाशक—कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें २ मूल्य रु. ४)

### निष्पाप वळी

सुप्रसिद्ध नॉर्वेजियन नाटककार हैन-रिक इब्सेन याच्या 'दि वाइल्ड डक' या नाटकाचें वनहंसी हे मराठी रुपांतर असून तें थोर मराठी नाटककार मामा वरेरकर यांनी केलें आहे. युनेस्कोच्या मदतीनें पौर्वात्य व पाश्चात्य मूल्यांच्या परस्पर आकलनासाठीं आंखलेल्या युनेस्कोच्या महत्त्वाच्या योजनेचा भाग म्हणून साहित्य अकादमीनें हें नाटक प्रकाशित केलें आहे.

वनहंसी या नाटकांत नाटककारानें पोकळ ध्येयवादी व सुधारणावादी लोकांची खिल्ली उडविलेली आहे. या नाटकांतील ग्रेग्रर्स वर्ल हे पुरुषपात्र आभासमय विश्वांत रमलेल्या एका कुटुंबात प्रवेश करते आणि वरवरच्या देखाव्याआड दडलेलीं अप्रिय सत्यें जिद्दीनें हुडकून काढते. पण हा माणूस नवीन जीवनाचा मार्ग दाखविण्याऐवजीं एका निष्पाप जिवाच्या एका लहान मुलीच्या मृत्यूस कारणीभूत होतो.

अशा या एकांगी व मानवी स्वभावावर आधारलेल्या नाटकाचें मराठी रुपांतर मामांनी नाटकाचा गाभा कायम ठेवून केले आहे. यामुळें तें सरस झालें आहे. नाटकांत कांहीं दृश्यें, चित्रें घातली असती तर बरें झालें असते.

—सदानंद चेंदवणकर

**वनहंसी**

(मूळ लेखक –**हैनरिक इब्सेन,** अनुवाद–**श्री. मामा वरेरकर,** प्रकाशक –साहित्य अकादमी, रविंद्र भवन, नवी दिल्ली. किं. २ रु. ५० पैसे, पृष्ठें १०८)



### मौलिक ग्रंथ

लोकसाहित्य विषयक अनेक ग्रंथ महाराष्ट्र राज्याच्या लोकसाहित्य समितीनें आजवर प्रकाशित केले परंतु त्यामध्यें लोकसाहित्याचें शास्त्रीय लेखन असलेला असा एकहि ग्रंथ नव्हता. ती तूट या ग्रंथानें भरून काढली आहे. या ग्रंथांत लोक साहित्याच्या भाषेबद्दलची चर्चा करण्यांत आलेली असून या साहित्याशीं निगडीत असलेल्या संस्कृतीची कल्पना विशद करण्यांत आलेली आहे. थोडक्यांत लोकसाहित्याची भाषा आणि संस्कृति हा विषय नजरेसमोर ठेऊनच ग्रंथाची उभारणी केलेली आहे हे विशेष होय.

या ग्रंथास कै. डॉ. कृ. पां. कुळकर्णी (लोकसाहित्याची शब्द संपदा व सादपडसाद शब्द), श्री. श्री. ना. बनहट्टी (स्त्री गीतांचे शब्दार्थ वैभव), डॉ. ग. मो. पाटील (लोकभाषेचे व्याकरण), श्री. न. शे. पोहनेकर (मराठीच्या माहेरांतील कांहीं शब्द विशेष), श्री. नी. शं. नवरे (मराठी म्हणींची मीमांसा), प्रा. अनंत काणेकर (सोनकोळयांची भाषा), प्रा. गजमल माळी, (लोक साहित्याची निर्मिती व परंपरा) व डॉ. सरोजिनी बाबर (लोकगीतें, स्वररचना) या अधिकारी व्यक्तींनी बहुमोल असे लेख लिहून सहाय्य केले आहे.

असा हा मौलिक ग्रंथ महाराष्ट्र राज्य सरकारनें प्रसिद्ध केल्याबद्दल अभिनंदन करावेसें वाटते. डॉ. बाबर यांनीहि ग्रंथ संपादन करण्याच्या कामी खूपच कष्ट घेतलेले आहेत हें ग्रंथ चाळतांना सहज दिसून येते.

—सदानंद चेंदवणकर

**लोकसाहित्य भाषा आणि संस्कृति**

(संपादिका – **डॉ. सरोजिनी बाबर,** प्रकाशक – श्री. व्ही. ए. आपटे, चिटणीस महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिति व उपसंचालक शिक्षण विभाग. महाराष्ट्र राज्य, पुणें १, किंमत २ रु. पृष्ठें १०८)

**देशासाठीं जो देई रक्त**
**तोच खरा मातृभक्त**











चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

## एक किंचित् प्रहसन

पडदा वर जातो तेव्हां प्रेक्षकांना रंग-भूमीवर तो आणि ती दिसतात.

तो अगदी रंगांत आला आहे.

तो लाडके, खरंच, प्रेम ही किती दिव्य चीज आहे, नाहीं? प्रेम आहे म्हणून आपण जगतों. प्रेम आहे म्हणून आपण मरतो.

ती खरं आहे. अगदीं खरं—अय्या, भाजी करपली वाटतं!

(एकदम उठून आंत पळते. तो कपाळा-वर हात मारून घेतो.)

—पडदा पडतो—

☆ ☆ ☆

## खरोखरच !

'लाडके," तो म्हणाला.

"तूं 'नाहीं' म्हणालीस तर मी प्राणत्याग करीन."

ती 'नाहीं' म्हणाली.

—ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो!

☆ ☆ ☆

## हजरजबाबी

रामराव आणि त्यांचा नोकर पांडू दोघेही अट्टल पिणारे होते. रामरावांची पिऊन झाली म्हणजे उरलेली पांडू पीत असे.

एकदां सकाळीं रामरावांनीं पांडूला हांक मारली.

"पांड्या, काल रात्रीं काय धुमाकूळ मांडला होतास? लोक काय बोलतात माहित आहे? ते म्हणतात तूं रात्रीं हात-गाडी घेऊन साऱ्या आळींत फिरत होतास."

"जी साहेब," पांडू टाळकें खाजवीत म्हणाला, "गोष्ट खरी हाये"

"पन सायेब, हातगाडीवर तुमी बसला व्हता हें इसरूं नगा, सायेब".

"काय म्हणतोस काय?" इति रामराव. "च्यायला; कमाल आहे बुवा या लोकांची ! पांड्या, जा तूं आपल्या कामाला. लोक गेले खड्डयांत. काय वाटेल ते बोलतात साले."

☆ ☆ ☆

## हिशोब चुकता !

साऱ्या बिलांचा हिशोब करून झाल्यावर दोन बिलें शिल्लक राहिली. एक डॉक्टराचं आणि दुसरं विजेचं.

"यांतलं आतां एकच कुठलं तरी देतां येईल आपल्याला," नवरा म्हणाला.

"कुठलं द्यायचं?"

"अर्थात् विजेचं." बायको म्हणाली. "डॉक्टर कांहीं येऊन तुमची नाडी कापून टाकणार नाहींत.

☆ ☆ ☆

## बाटली आणि बाटली

पंचवीस वर्षं वैवाहिक आयुष्य कंठलेले एक गृहस्थ म्हणतात:

"माझं जीवन फार चमत्कारिक झालेलं आहे. रात्रीं झोंपण्यापूर्वीं माझ्या सर्वांत लहान मुलाला त्याची बाटली मिळेल आणि सर्वांत मोठ्या मुलाला त्याची बाटली मिळणार 'नाहीं' याची मला फार खबरदारी घ्यावी लागते.

☆ ☆ ☆

## ब्रह्मचर्य हेंच जीवन

सत्तराव्या वर्षी ब्रह्मचर्यावस्थेंत मरण पावलेल्या एका गृहस्थाचे अंतिम उद्‌गार: "मी लग्न न करतां राहिलों. माझ्या वडि-लांनीं सुद्धां तसंच केलं असतं तर किती बरं झालं असतं

☆ ☆ ☆

## नस्ती उठाठेव

घोड्याच्या शेपटीला केंस किती असतात. हें तो प्रत्यक्षच मोजून पाहत असतां घोड्यानें लाथ झाडली——

ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो!

☆ ☆ ☆

## माझी आवड

आधीं येतो शनिवार
नंतर येतो सोमवार
त्या दोघां 'मध्यें' येतो
तो मजला बहु आवडतो.

☆ ☆ ☆

## म्हणून हे इतके उंदीर जगांत

साहेब सुपरिटेंडेंटना खोलींत बोलावून दम देतात.

सुपरिटेंडेंट हेड क्लार्कला दम देतात.

हेड क्लार्क कारकुनास दम देतो.

कारकून घरीं जाऊन बायकोला दम देतो.

बायको मुलावर राग काढते.

मुलगा बाहेर जाऊन मोत्याच्या पाठींत धपाटा घालतो.

मोत्या तो राग मनीवर काढतो.

मनी उंदराला पंजाचा तडाखा देते. उंदीर मग घरीं जाऊन——

म्हणून हे इतके उंदीर जगांत.

●●●








अनुक्रमणिका

(पान १० वरून)

वेळ प्रसंगीं त्यांनी मनांतल्या उभारणाऱ्या उर्मि संयमित करून गांधींशीं जुळवून घेतलें. गांधी-आयर्विन समझोता १९३१ मध्यें झाला, व त्यानंतर गांधी गोलमेज परिषदेला गेले. इकडे उ. प्रदेशामध्यें नोकरशाहीनें त्यांचा स्वभाव ओळखून त्यांना प्रक्षोभित केले, आणि त्यामुळें सर्वत्र पकडा पकडी झाली, व गांधी १९३२च्या जानेवारीचे सुरवातीस भारतांत येतांच त्यांना अटक झाली. आणि एक नवी परिस्थिति उत्पन्न झाली. त्यावेळीं जर पंडितजींनीं अधिक संयमानें घेतले असते व सहज व स्वाभाविक स्फूर्तीला विवेकानें व दीर्घ दृष्टीनें लगाम घातला असता तर स्वातंत्र्याच्या लढयाचा इतिहास कांहीं निराळा झाला असता. १९३४ सालीं आम्ही अनेकजण तुरुंगांत असतांनाच गांधीनीं सत्याग्रह तहकूव केला व सत्याग्रह करण्याचा हक्क केवळ आपलाच आहे, असा फतवा काढला आणि त्यामुळें राजकारणाला नवें वळण लागलें. पुन्हां राजकारण घटनात्मक व शांततामय झालें. प्रांतिक सरकारें १९३५ च्या कायद्याप्रमाणें स्वायत्त अशीं अस्तित्वांत आलीं आणि मग पंडितजींची दृष्टि थोडी विधायक स्वरुपाची झाली. कायद्याच्या मार्गानें समाजाचें व आर्थिक व्यवस्थेचें परिवर्तन समाजवादाकडे नेतां येईल, असें ज्यांना वाटले व त्याप्रमाणें कॉंग्रेस प्रांतांतून कांहीं झालें. फार झालें असें नव्हें, डोळयांत भरण्यासारखें झालें, असेंहि नव्हे, मुंगीच्या पायाची ती गति होती, स्थिति नव्हती. जें स्थित होते त्याच्या गतीची चिंता व्यक्त होत होती. तथापि, याही काळांत पंडितजींचें मन जागतिक घडामोडीनें व्यस्त व व्याकूळ झाले होते. मुसोलिनी व हिटलर या जोडीनें राजकारणाच्या पटांगणावर चौफेर खेळ सुरू केला होता व खेळाचे प्रॅक्टिसिंग नेट म्हणून स्पेनमध्यें अनुभव घेतला होता. या सर्वाविरुद्ध पंडितजींनी आपला आवाज उठवला होता. त्यांच्या आवाजाला आंतरराष्ट्रीय जगांतील पुरोगामी गटांनी व व्यक्तींनी साथ दिली होती. तथापि, युद्धाच्या भयानें, निर्धारानें व निश्चयानें कोणी पाऊल उचललें नाहीं. १९३८ च्या ऑगस्टमध्यें "छत्रीधारी" चेंबरलेननें म्युनिचचा करार केला, शरणांगतीला धैर्य मानलें, लोटांगणाला ललकारी म्हणून पुकारले, आणि ह्या घटनेविरुद्ध भारतांत नेहरूंनीं व कॉंग्रेसनें मोठा आवाज उठवला. आणि १९३९ सालीं ऑगस्टमध्यें जेव्हां युद्धाची नौबत वाजली त्याचबरोबर भारताचें स्वातंत्र्याकडील मार्गावर पडणारे लहानसे पाऊलहि गतिशून्य झालें, आणि मग अक्षरशः भारताचें राजकारण आंतरराष्ट्रीय राजकारणाचा भाग झालें. गांव राहिलं तर राव राहतील, अशी स्थिति झाली. गांव वाचलें तर घर राहिल. तसेंच जगांत जर लोकशाही स्वातंत्र्य राहील तर भारताला ते लाभेल. आणि त्यादृष्टीनें कॉंग्रेसनें नेहरूंच्या नेतृत्वाखालीं आपली भूमिका कायम व स्पष्ट केली.

दुसऱ्या महायुद्धांत भारताला स्वातंत्र्य दिलें तर, आणि तरच भारत मुक्त मनानें जागतिक लढ्यामध्यें स्वातंत्र्याच्या व समतेच्या बाजूनें भाग घेईल. स्वतः गुलामींत राहून अन्यत्र गुलामीविरुद्ध लढणें म्हणजे स्वतःच्या शृंखला अधिक भक्कम करणें आहे

---

(पान ३९ वरून)

सौ. दाते : ओ ! व्हेरी फाईन ! मीही पुण्यांत जिमखान्यावर असलेल्या एका बंगल्यांत रहातें.

श्री. दाते : ओहोहो ! अलौकिक ! म्हणजे मी तुम्हांला जिमखान्यावर पाह्यलं असावं. तिथें आपण दोघें भेटलों असूं.

सौ. दाते : Really अलौकिक ! हीही शक्यता आहे. पण मी नक्की कांहीं सांगूं शकत नाहीं.

श्री. दाते 'लकी'च्या शेजारीं असलेल्या 'ब्रह्मघोटाळा' ह्या इमारतींत मी रहातों.

सौ. दाते : अहो मीही त्याच 'ब्रह्मघोटाळचांत' रहातें. किती अपूर्व योगायोग !

श्री. दाते मी तिसऱ्या मजल्यावरील तीन नंबरच्या खोलींत रहातों.

सौ. दाते : Now it's Killing! अहो 'टेरीफीक' योगायोग. अहो मीही तिसऱ्या मजल्यावरील तीन नंबरच्याच खोलींत रहातें.

श्री. दाते : (विचारपूर्वक) थांबा ! खोली सांपडली ! आतां किल्लीही सांपडेल ! तुम्हांला माहीत आहे ? माझ्या झोंपण्याच्या खोलींतील बिछान्यावर एक निळी चादर आहे आणि हा माझा बिछाना गॅलरी आणि स्वयंपाकघर ह्यांच्यामध्यें आहे.

सौ. दाते अहाहा, किती सुंदर योगायोग ! अहो माझ्याही बिछान्यावरील चादर निळी आहे; आणि तोही गॅलरी आणि स्वयंपाकघर ह्यांच्यामध्यें आहे.

श्री. दाते : ओहोहो ! किती अघटित, किती चमत्कारिक, किती अलौकिक. ह्याचा अर्थ आपण दोघें एकाच खोलींत रहात असलों पाहिजे [व एकाच बिछान्यावर झोंपत असलों पाहिजे. म्हणजेच [आपण] तिथें एकमेकांना भेटलों असूं ! Oh, how romantic!!

सौ. दाते : Indeed a romantic योगायोग ! शक्य आहे. आपण एकमेकांना तिथें भेटलों असूं. कदाचित काल रात्रींही. पण मला बाई कांहीं नक्की आठवत नाहीं.

श्री. दाते : हे सभ्य स्त्री ! मला दोन वर्षांची एक मुलगी आहे आणि ती माझ्याबरोबर रहाते. तिचे केंस काळे आहेत पण ती लक्षांत रहाते ती तिच्या चमत्कारिक डोळ्यांमुळें. तिचा एक डोळा लालबुंद आहे तर दुसरा पांढरा आहे म्हणूनच तिचं नांव मी लालीपा ठेवलंय्.

सौ. दाते आतां मात्र शर्थ झाली बाई. अहो, मलाही एक लहान मुलगी आहे आणि तीसुद्धां नेमकी दोन वर्षांची आहे. तिचासुद्धां एक डोळा लालबुंद व दुसरा पांढरा आहे आणि म्हणूनच तिचं नांव मी लालीपा ठेवलंय्.

श्री. दाते : अहाहा ! Finish! Finish! कदाचित् तुमची मुलगी आणि माझी मुलगी एकच असेल.

सौ. दाते असेल, असेल तसंही शक्य असेल. पण किती अलौकिक ! [किंचित् दीर्घ शांतता. घड्याळांत ठोके सुरूं होतात. भारावून श्री. दाते उठतो व सौ. दातेजवळ जातो. श्री. दातेच्या भांबावलेल्या चेहऱ्याकडे पाहून ती आश्चर्यचकित होते व चटकन् उठून उभी रहातें.]

श्री. दाते : (तिच्या खांद्यावर हात ठेवीत) आतां ओळखलं तुम्हांला. मी तुम्हांला निश्चितच पूर्वी पाह्यलं आहे... ...अग, तूं माझी बायको आहेस ... तारा ... तुला इतका वेळ विसरलों होतों बघ !

सौ. दाते : (त्याच्या खांद्यावर हात ठेवीत) वसंत ... डार्लींग.... मीही इतक्या लवकर तुला कशी रें विसरलें ? (त्याच्या खांद्यावर डोकं टेकतें ... अंधार ... चटकन् काश्या प्रवेशतो ... ...प्रकाश फक्त काश्यावर.).....

...[ह्या प्रकाशांतून काश्या काय प्रकाश पाडतो तें पुढील अंकीं]

● ● ●








ही काँग्रेसची दृष्टि होती. युद्धांत भाग घेण्यासाठीं नेहरू उत्सुक होते. त्यादृष्टीनें सारा भारत संघटित व समर्थ करण्याची त्यांची मनीषा होती, आणि राजकारणांतील एक डाव म्हणून मंत्रीपदाचा त्याग काँग्रेसनें केला. युद्ध जसजसें रंगू लागलें तसतसें इंग्रजांच्या धूर्त राजकारणानें न करतां केले आहे, न देतां दिले आहे, असा आभास निर्माण करण्याचा प्रयत्न केला. १९४१ च्या जूनमध्यें रशियावर हल्ला झाला व त्यानंतर थोडयाच दिवसांनी अमेरिका युद्धांत पडली. तात्पर्य युद्ध जागतिक झाले. आणि अमेरिकेच्या आग्रहानें चर्चिलनें क्रिप्समार्फत कांहीं योजना पुढें केली आणि ती काँग्रेसनें स्वीकार करण्याचा संभव दिसतांच ती रद्द करण्यांत आली. अहिंसेचें तत्त्वज्ञान या संदर्भांत अप्रस्तुत ठरवून पंडितजींनी युद्ध चालविण्याची जबाबदारी कांहीं शर्तींवर पत्करण्याची तयारी दाखविली. पण जेथें द्यावयाचेंच नव्हते तेथें बहाणा करून क्रिप्स साहेब चर्चिलच्या आदेशानें बोलणीं फिसकटून निसटले. काँग्रेसला स्वातंत्र्य तांबडतोब हवें होते, व त्यासाठीं सत्तांतर व त्यांतूनच युद्ध प्रयत्न. तरीसुद्धां स्वातंत्र्याची घोषणा करावी व घटना समिती युद्ध संपतांच नेमून तिनें घटना तयार करावी व त्यांतून निर्माण होणाऱ्या सरकारला ब्रिटीशांनीं सत्ता प्रदान करून भारत सोडावे. यापैकीं एक योजना तावडतोबीची व एक योजना कालांतराची. दोन्हीं बाबतींत ब्रिटन कांहींही करण्यास तयार नव्हतें, आणि या पार्श्वभूमीवर १९४२ च्या ऑगस्टमधील काँग्रेसचा ठराव झाला. "छोडो भारत" ही त्यावेळची ऐतिहासिक घोषणा ठरली. ९ ऑगस्ट १९४२ पासून जून १९४५ पर्यंत पंडितजी नगरचे किल्ल्यांत होते, गांधीजी मे १९४४ पर्यंत आगाखान पॅलेसमध्यें बंदी होते. त्यांच्या गैरहजेरींत जें झालें तें सर्वज्ञात आहे.

या काळांत क्रांतीचा प्रक्षोभ हिंसेच्या मार्गानें अभिव्यक्त झाला व त्याची जबाबदारी काँग्रेसवर टाकण्यांत आली. साऱ्या भारतभर हुकूमशाहीचें राज्य झालें, बेकारांना नोकरीची प्रलोभनें दाखवून, व्यापाऱ्यांना नफेबाजीचा परवाना देऊन इंग्रजानीं त्यांना जें जें पाहिजे होते तें तें घेतलें. बंगालमध्यें १९४३ व १९४४ च्या वर्षांत ६७ लाख लोक भूकबळी पडले. जगभर इंग्रजांची बेअब्रू झाली. जगाला बनविण्यासाठीं मधून मधून ब्रिटीश सरकार बाबडया उठवी, पण तडजोड झाली नाहीं, कारण करावयाची नव्हती. मात्र क्रिप्स योजना कायम आहे असें ब्रिटिश पार्लमेंटला वारंवार सांगण्याची ढोंगी क्लृप्ती स्वीकारण्यांत आली होती. ८ मे १९४५ रोजीं युरोपांतील महायुद्ध संपलें. जून ४५ मध्यें निवडणुका झाल्या आणि चर्चिल पक्ष नेस्तनाबूत झाला, मजूर पक्ष अधिकारारूढ झाला. आणि तेथून भारताच्या राजकारणाचीं चक्रें जोरानें हलू लागलीं, आणि १९४६ च्या २ सप्टेंबरला तात्पुरते सरकार अधिकारारूढ झालें, त्यांत मुस्लीम लीगनें भाग घेण्याचें नाकारलें. त्या सरकारचें मुख्य पद पंडितजींकडे होते. कारण ते काँग्रेस सरकार जरी नसले तरी वस्तुत: तसे होते. आणि तेव्हांपासून ते मृत्युपर्यंत पं. नेहरू हे मध्यवर्ति सरकारचें महामंत्री राहिले. १८ वर्षांच्या काळांत त्यांनीं एक जबाबदार महामंत्री म्हणून काम केले. जीवनांतील क्रांतिकारक पर्व त्यांनी मागें टाकलें, इतकेंच नव्हे तर, क्रांतीची तिखट व तापट भाषा बोलत असले तरी त्यांचे हात स्थिरावलेले होते. त्यांच्या कृतीची गति मंद होती. क्रांतीचे नेते क्रांति-नंतरच्या काळांत दिलेलीं वचनें पाळूं शकत नाहींत, हा जगांतील अनुभव भारतांतहि आला. त्यांच्या इतकी लोकप्रियता जगांत कुणाला लाभली नाहीं. काँग्रेसमध्यें त्यांनी अनिर्बंध सत्ता चालविली व पानप्रेक्षणाइतकाच लोकशाहीचा मंत्र म्हटला. काँग्रेस, काँग्रेसचा संसदीय पक्ष, काँग्रेस कार्यकारिणी, अखिल भारतीय काँग्रेस कमिटी, मंत्रीमंडळ या सर्वांचे संबंध त्यांच्या हयातींत असे राहिले कीं, त्यांच्या इच्छेविरुद्ध कोणी जाऊं शकले नाहींत. महामंत्री व काँग्रेसचे अध्यक्ष ही दोन्हीं पदें त्यांनी एकाच वेळीं हाताळली आणि त्यांतून त्यांची वृत्ति कितीही लोकशाहीवादी असली तरी तिच्यावर अपरिहार्यपणें हुकूमशाहीचा रंग चढला. त्यांनीं मनांत आणलें असते तर, राजकारणांतील त्यांची क्रांतिकारी दृष्टि आर्थिक व सामाजिक कारणांत प्रभावीपणें यशस्वी झाली असती. पण व्यवहाराच्या गोष्टी ते करूं लागले, त्यांत वावगे होते, असें नाहीं. मात्र एवढेंच कीं, ज्याला रणांगणांत जावयाचे आहे त्यानें पार्थिव पूजेंत वेळ घालवूं नये. त्यांचें स्वातंत्र्योत्तर कालांतील वर्तन हेंहि आंतरराष्ट्रीय राजकारणाकडे लक्ष देऊन समर्थनीय ठरवतां येईल. तथापि, कांहीं आपत्ती आंतरराष्ट्रीय राजकारणांत भारतानें जी दृष्टी ठेवली, त्यामुळें भारतावर आल्या. याचा अर्थ असा नव्हे कीं, ते धोरण चुकले होते. जें चुकत होतें ते असे कीं, राष्ट्रीय संघटनेवर त्यांनी अधिक लक्ष द्यावयास हवे होतें' तें घडलें नाहीं. ते क्रांतिकारक विचाराचे होते, संपूर्णपणें स्वातंत्र्य मिळेपर्यंत त्यानंतर क्रांतिवादाचे व क्रमवादाचे ते उपासक झाले. आणि जेवढया प्रमाणांत व जेवढया विस्तारांत स्वातंत्र्याचा प्रत्यक्ष अनुभव समृद्धीच्या दृष्टीनें भारतास यावयास पाहिजे होता, तेवढा आला नाहीं, हें सत्य सांगितले पाहिजे. त्यांना सत्तेचा अभिलाष नव्हता. पण आपण जर नसूं तर चालणार नाहीं, ही क्षम्य भावना त्यांच्या मनांत होती, हें निश्चित. तथापि, हेंहि खरें कीं, त्यांच्या क्रांतिकारक जीवनानें भारताच्या आजच्या प्रगतीला मोठी प्रेरणा दिली आहे. ●●●












# काय हो ! चक्क 'तमाशा' आहे कीं !!



**"कोण** म्हणतो 'तमाशा' आहे म्हणून?"

"मी म्हणतों. मी पाहून आलों. आणि तेव्हांपासून साऱ्यांना सांगत सुटलों आहे कीं, गिरगावांत, टायबूट घालून, आपल्या बाय-कांना बरोबर घेऊन तमाशा पहाण्याची खास सोय ह्या साहित्य संघवाल्यांनीं उपलब्ध करून दिली आहे. अहो गण गौळण आहे. वग आहे. वगांत इरसाल पात्रं आहेत. नाच आहे. बाईचा आहेच पण पुरुषाचा सुद्धां आहे कीं!"

"अहो! पण तमाशा पाचकळ असतो म्हणतात"

"कांहीं वाक्य इथेंही 'भाव' खाऊन जातात. पण एकूण तमाशा पाहण्याची सभ्य सोय झालीय् खरी!"

"अहो पण———"

"पण नाहीं आणि परंतु नाहीं. तुम्हीं एकदां जाऊन पहा आणि मग् बोला काय बोलायचं तें!"

त्या जिद्दीवर मी नाटक—(तमाशा—वरील मताप्रमाणें) पहायला गेलों. नशिबानें कुणीं त्याला 'लोकनाट्य' अशा सभ्य वासनांत गुंडाळलें नाहीं हें माझें नशीबच! साहित्य-संघाचें छत्र आणि 'सरी ग सरी'चा सभ्य तमाशा असा मेळ होता. सुरुवातीलाच गण गौळण झाली. त्या आधीं झांज ढोलकीची धमाल आपल्याला आवडली. "कांहींतरी वेगळेंच करा" असं वारंवार बजावून सांग-णारांनी मनमोकळेपणानें 'वेगळें' पहायची तयारीही केली पाहिजे असं तेव्हां मला वाटून गेलं.

त्यानंतरचा सारा वग हा एक वेगळयाच दृष्टिकोनांतून पहायला हवा. ही सारी कथा एक मध्यवर्ती विचाराभोंवती गुंफली गेली आहे. ती सांगण्याचा हा जो प्रकार आहे त्या प्रकारामुळेंच तिचें नाविन्य वाढलें आहे. भोंवतालचा वेष तमाशाचा, वगाचा असला तरी वेदना मात्र पुन्हां एका पांढर-पेशाचीच आहे. कांहींशीं सार्वत्रिक स्वरु-पाचीच आहे. ती एक Social Safire आहे. कुचंबलेला, अर्थशून्य जीवन जगणारा, त्या जीवनाचा विचार करण्याची कुवत नसलेला व तशी गरजही न मानणारा अशा प्रका-रचा आजचा माणूस प्रतिनिधिरूपानें इथें दिसतो. त्याच्या सामान्य गरजाही त्याला भागवतां येत नाहींत. तो कुणाच्या तरी हातचें सदैव खेळणें बनतो. मधुनमधून आपण खेळणें बनलों आहोंत याची खंत व्यक्त होते. पण पुन्हां पुन्हां तो पडतच राहतो. नवे नवे प्रयत्न करीतच राहतो. ते पुन्हां कां करतो हेंही त्याला कळतच नाहीं. स्वार्थी जग अशा प्रामाणिक प्रयत्नशील माणसांचा बळी घेतच राहतं. परिस्थितीच्या ठेंचांनीं रक्तबंबाळ झालेलीं हीं माणसं 'ठेंच कां लागली' याचा विचारही करूं शकत नाहींत. कोणतं? काय? कशासाठीं? या प्रश्नांचीं उत्तरें कधीं मिळतच नाहींत. सारं जीवन टक्के खात खात जातं. आणि मग यांतलं कांहींही बदलणं आपल्या हातीं नाहीं हें ध्यानीं येतं. पण फार उशिरां! मग आहे हें असंच राहूं द्या! चालतंय् तें तसंच चालूं द्या अशा निर्णयाप्रत तो येतो. सारेच प्रश्न अनुत्तरित राहतात—कारण जीवनाचं कोडं जगूनही कधीं उलगडतच नाहीं!

हा गंभीर विचार आहे नाहीं का? पण वग मात्र गंभीर नाहीं. मुकिंदा जोशी, त्याचा मित्र बीटणीकवाला पेंद्या शहाणे, जोशी मास्तर (जरा जपून. त्यांच्या हातांत छडी आहे. वाघमाऱ्या समजून चोप देतील. तुम्हीं प्रोफेसर असलांत तर अधिक काळजी घ्या.) मंदा (मुकिंदाची पत्नी), नालासोपा-ऱ्याच्या गाडींत भांगेच्या तारेंतच लटकून उभा राहणारा टिकमकर [आपल्याला फार आवडली—भांग नव्हे—ही वल्ली] 'समाजवादी' मारवाडी, मारखाऊ गोंदुअण्णा, असल्या चित्रविचित्र माणसांच्या मेळाव्यांत चार तास केव्हां निघून जातात तें कळत नाहीं. विशिष्ट माध्यम स्वीकारल्यानंतर मात्र लेखकानें त्यांत कसूर केली नाहीं. मुकिंदा जसा असावा तसा आहे. कुचंबलेला, पण पाप पुण्याच्या कल्पनेनें भारलेला, भावडा. कावलेला, वैतागून जाऊन मैल जिभेनें बोलणारा असा पांढरपेशा मुकिंदा भेटतो. बरें वाटतें. पेंद्या सुपीक डोक्याचा असावा तसा आहे. हें सारें रूपकच मुळीं मोठें अन्व-र्थक वाटतें. 'दिपोटी' म्हणतांच छडीचा हात खालीं घेणारा मास्तर. पैसे करणाऱ्या पोरकट वाघमाऱ्याचे पाय चेपणारे कारकून (खुद्द मुकिंदा सुद्धां) 'समाजवादाचा' केवळ जप करणारा मारवाडी, 'जनतेचा पैसा' हीं त्याची कानाला उगीचच सुखवून जाणारी घोषणा. सारें कांहीं पटतें. तमाशाच्या माध्यमांतून तें हृदयाला जाऊन भिडतें. कांहीं ठिकाणीं गति मंदावते. तोच तोपणाही जाणवतो. पण ह्या वगाची रंगत येवढी मोठी आहे कीं, प्रेक्षक खदखदत राहतात. श्लेषात्मक, उपरोधात्मक वाक्यें लोक बरो-बर उचलतात.

प्रयोगही मोठा झकास होतो. मधु कदम (पेंद्या), श्रीकान्त मोघे (मुकिंदा), ललिता केंकरे (मंदा), दत्ता भट (मास्तर), गिरीश हिवाळेकर (वाघमारे), अरविंद देशपांडे (टिकमकर) ह्यांच्या कामाचा खास उल्लेख करायला हवा. विशेषतः श्रीकान्त मोघे, मधु कदम ह्यांच्या जोडीची रंगत भरपूर. केंकरेबाईच्या पायांतले चाळ सारखे सुटत असावेत. त्यामुळें त्यांच्या नृत्यांत वारंवार अडथळे येत असावेत. [कदाचित तोही Plan असावा. तमाशांत हें असेंच असते] ढोलकी-वाल्याचें खास अभिनंदन! तमाशाचा साज सजविणाऱ्या दिग्दर्शक अरविंद देशपांडे यांचा गौरवपूर्ण उल्लेख करणें आवश्यक आहे. कारण त्यांनीं सबंध वगाचें 'बेअरिंग' कायम व रंगतीचें राखलें आहे.

पांढरपेशा प्रेक्षकाला वेगळ्या माध्यमांतून सांगितलेली आपलीच कथा ऐकतां—पाह-तांना, रुचिपालट म्हणूनही ही कथा आवडावी. जीवन अर्थशून्य असलं तरी हा वग मात्र 'अर्थशून्य' नाहीं खास!

●

# करुण नाटकाची (करुण) कहाणी

**"मुक्ता** वर्तक—आपल्यापैकीं प्रत्येकाच्या ओळखीची आहे ही मुलगी. नऊ अडतीसची गाडी घाईघाईनें गांठणारी, संध्याकाळीं 'थकून' कंटाळून घरीं परतणारी, रस्त्यांत मजेनें चाललेलें एखादें जोडपें किंवा बाबागाडींत झोंपलेलें कापसासारखें मऊ मऊ मूल पाहून मुके कढत निःश्वास टाकणारी. स्वतःच्या ठणकणाऱ्या मनाला पुन्हां पुन्हां बजावणारी कीं हें तुझ्यासाठीं नाहीं–हें तुझ्यासाठीं नाहीं—"

मुक्ता वर्तक नांवाच्या तुमच्या माझ्या परिचयाच्या एक पिचलेल्या, आयुष्यांत सतत अपेश, अवहेलना, एकाकीपणच वांटयाला आलेल्या मुलीची ही जीवन कथा! वास्तविक ही कथा तशी नवीन नाहीं. पण हें 'स्वप्ननाटय' मात्र नवीन आहे. हें नवीन "स्वप्ननाटय" [फँटसीला लेखकानें वापरलेला प्रतिशब्द–पुस्तकांना तो बरोबर वाटला नाहीं हा भाग अलाहिदा] सादर करतांना [रंगमंचावर नाटकाचे वेळीं वाटण्यांत आलेल्या ("तुम्हींच घ्या" पद्धतीनें) पत्रकांतही] लेखकानें एक भलें मोठें स्पष्टीकरण करणारें भाष्य केलें आहे. नाटक [विशेषतः पहिल्या प्रयोगाला आवर्जून पहायला आलेले व बोलावलेलेही] प्रेक्षक हे सर्वसामान्यपणें किमानपक्षीं नाटक समजूं उमजूं शकतील असें गृहित धरायला हरकत नव्हती. आणि 'फॅण्टसी' हा नाटयप्रकारही मराठी प्रेक्षकाला अगदींच अपरिचितही मानण्याचें कारण नव्हतें. परंतु 'स्वगतें' नकोत म्हणण्याच्या काळांत लेखकानें अगदीं 'लाऊडली' एक स्वगत साऱ्यांना ऐकविलें. त्यामुळें साहजिकच नाटक समजायला कुणालाच त्रास पडला नाहीं. आधींच सांगितल्यानें सारें कसें स्वच्छ समजलें आणि समजण्याच्या आनंदांतच तें "झटपट" संपल्याच्या आनंदाची भर पडली आणि प्रेक्षक मोठ्या 'खुषींत' बाहेर पडले. "पांच, तीन, दोन" वाले मात्र जरा (बाहेर मुसळधार पाऊस असूनही) गरम झाले. कारण त्यांचा गरम खिसा अक्षरशः गार झाला होता. [त्यांत नाटककारानें ह्याला "संपूर्ण नाटक" म्हटल्यानें तर (चक्क लेखी) हीं मंडळी फारच संतापलेली दिसली.] कांहीं प्रेक्षक लांबलांबून मुद्दाम आले होते. "हें काय? संपलं?" म्हणून त्यांनीं जाहीर उद्‌गार काढले. तर कांहीं माणसें जागेवरून हलायलाच तयार होइनात. पण तें जाऊं द्या!

आपण "मुक्ता वर्तक" ह्या स्त्रीच्या कथेकडे वळूं या! "मुक्ता वर्तक" ही व्यक्तित्वाचा सतत कोंडमारा झालेली, अपुऱ्या आशांचे, एकाकीपणाचं, कौटुंबिक जबाबदाऱ्यांचें, स्वप्नभंगांचें ओझें डोक्यावर वाळगणारी एक मुलगी आहे. (खरं म्हणजे प्रौढ कुमारिका आहे.) लहानपणापासूनच दैव तिचा पाठलाग करतें. लहानपणीं चित्रांचें पुस्तक तिला पहावयाला हवें म्हणून ती घेते आणि ती 'चोरटी' ठरते. बाप भामटा, लफंगा असतो म्हणून संसारांत सदा तिला ओढाताण सहन करावी लागते. खरं म्हणजे तिचं लहानपण तिच्या लहानपणांतच संपतं आणि ती एकदम "मोठी" होते. "मोठें"पणांतल्या यातनाच तिच्या वांटयाला येतात. मन मारून ती घरासाठीं झटते. पण आई, वहिणी कुणीच तिला जाणून घेण्याचा प्रयत्न करीत नाहींत. तिचा बाप भामटा होता, पण प्रेमळ होता. चोरून कां होईना बाहुली तो आणून देतो (तेंही एक स्वप्नच—पण स्वप्नांतही सत्यांतील घटनांचा–सूत्राचा आधार असतो असें म्हणतात). तिची आई मात्र तिच्याशीं जें वर्तन करतें त्याला तसें संयुक्तिक व तर्कसंगत कारण नाटकांत सांपडत नाहीं. वास्तविक पडता संसार मुक्तानेंच सांवरला होता. वय व (तारुण्य) वांया जात असतांनाही ती वहिणीप्रमाणें पळून न जाण्याइतपत शालीन आहे. प्रेमाच्या सीमारेषेवरून, कुटुंबाच्या दायित्वामुळें परत फिरण्याइतकी मनाची खंबीरताही तिच्याजवळ आहे. तिला विशेषसें रूप नाहीं. [नाटकांत तसं म्हटेंल आहे–पण प्रयोगांत तसं जाणवलं मात्र नाहीं] पण नोकरी करणाऱ्या कुरुप मुलींची सुद्धां पटकन 'लग्नें' जमतात (कदाचित् 'मुक्ता'चा योगच नसावा) घरांत असून निराधार, आई असून 'निष्प्रेम' जीवन वांटयाला आलेली. बाप असून त्याचें नांवही सांगायला जिला लाज वाटावी अशी, गर्दीतही एकाकी असलेली ही मुलगी आहे. तें कुचंबलेलं, आक्रंदणारं, पिचलेलं, मन अखेर होतं एका क्षणि, विकल शरीराच्या पिंजऱ्यांत! त्या पिंजऱ्याची शक्ति सरली. पण आशा अमर असते. स्वप्नें पाहण्याची शक्ति अमर असते. मुक्ता वर्तक अंथरुणांत पडते आणि मग तिचा 'स्वप्नसंचार' सुरूं होतो. जें जें तिच्यापासून दूर गेलेलें असतें, तें तें त्या स्वप्नांत तिच्या जवळ येतें. ती पत्नी होते, माता होते. तृप्त सांसारिक जीवनाचें रमणीय स्वप्न तिला त्या अंतिम क्षणीं सुखवितें. आणि मग मुक्ता वर्तक खऱ्या (व सर्व अर्थांनीं) "मुक्त" होते. लौकिक जगानें तिला जें जें नाकारलं तें तें ती मृत्यूच्या क्षणीं, स्वप्नांच्या राज्यांत 'मुक्ताराणी' बनून उपभोगते. त्या क्षणीं तरी तिचा अतृप्त तळमळणारा आत्मा तृप्त होतो. तिला समजूं शकणारा बालमित्र भेटतो, बाप तिला बाहुली देतो. प्रियकर तिला प्रेम देतो. दैव तिला मातृत्वही देते.

'अस्ताई' ची स्थूलरूपानें कथा ही अशी! तिच्या स्वप्नांतली ही तृप्ति दाखविण्यासाठीं, तिची भावनिक स्पंदनें जाणवावींत म्हणून छोटी मुक्ता, मोठी मुक्ता, ऑफिसर, विद्याधर, युवराज, रमेश ह्यांचीं योजना झाली आहे. हृदयशून्य आई व सहानुभूतिशून्य मास्तरीण ह्या कारुण्याचा रंग भरायला चांगली मदत करतात. पण ह्या स्वप्ननाटयांत थोड्या वेळांत बरेंचसें कांहींतरी दाखविण्याची किमया करावयाचा संकल्प असल्यानें प्रसंगांची, घटनांची गर्दी (व माणसांचीही) खूप झाली असून त्याला एखाद्या चित्रपटांतील हलत्या चित्रांचें स्वरुप आलें आहे. त्यामुळें एकही प्रसंग उत्कट होत नाहीं. मुक्ता एका प्रसंगांत ओक्साबोक्शी रडते. पण तिच्या हृदयाची वेदना हृदयांत कालवाकालव

(पान ६० वर पहा)








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास







## "डरो मत ! सब कुछ ठीक है !"

घाबरूं नका. सर्व कांहीं ठीक आहे. आबादी आबाद आहे. आतां पंजाबमध्यें थोडसं 'कैरों' प्रकरण गाजूं नये, पण गाजलं. वास्तविक त्यांत एवढं गाजायचं तें काय ? मंत्री झाला कीं, त्याच्या नातेवाईकांनी थोडाफार त्याच्या 'नांवाचा' व 'पदा'चा फायदा उठविणं हें तर्कसंगत नाहीं काय? पण नाहीं. नेहरूजी गेल्याबरोबर 'कैरों'हीं गेले. वास्तविक पंडितजींचे ते फार लाडके होते. त्यांच्याशिवाय भारतीय सेनेंत लढायला सैनिक मिळणार नाहींत अशी त्यांची व (पंडितजींची) भावना होती. म्हणूनच तर पंडितजींनी हा पंजाबचा 'पठ्ठ्या' पकडून ठेवला होता. पण पंडितजी गेले आणि 'पठ्ठ्या'हीं (राजकारणांतून) गेला. पंजाबमध्यें नवी राजवट सुरू झाली आहे. त्याच्या नव्या मुख्यमंत्र्यांनीं आपली मिळकत जाहीर केली आहे. व 'कैरों' युगाचा अस्त झाल्याची ग्वाही दिली आहे. घाबरूं नका. आतां पंजाबांत 'ऑल्वेल' आहे. पण आपले लोकच घाबरट ! जरा कुठें मुरुडला एक विमान उतरलें. त्यांतून कांहीं माणसें उतरलीं. त्यांचें विमान बिघडलें आहे असें सांगून त्यांनीं स्टेट ट्रॅन्सपोर्टमधून मुंबईला पार्टस् आणण्यासाठीं जागा मिळविली. मुंबईत विचारे ते पडले परके लोक ! हॉटेलमध्यें राहिले. आणि मग विमानानें परत गेले. आतां तशी घटना साधीच कीं नाहीं? विमानानें काय माणसें येत नाहींत कीं हॉटेलमध्यें राहात नाहींत? पण 'मुरुड'चें 'विमान' गाजलें. आतां त्या "वॉलकॉट" सायबाला आमचा देश 'लई' आवडतो त्याला आम्हीं काय करणार? मागें एकदां पळाला. आतां पुन्हां पळाला. आतां तो पळपुटा साहेब आहे म्हणून का आमच्या लोकांनीं पळपुटेपणा करायचा? तो पळाला आणि आम्हीं पळालों नाहीं. त्यानें त्याचा नेहमींचा धर्म पाळला. आणि आम्ही आमचा धर्म पाळला. फितुरी हाही एक आमचा राष्ट्रधर्मच ! परंपरा तशी फार जुनी ! अगदी हजारों वर्षांपासूनची ! आमचा एकादा पोलीस, विमानाधिकारी त्या परंपरागत धर्मानें वागलाही असेल ! पण तसें भिण्याचें कारण नाहीं ! सारें कांहीं ठीक आहे ! डरो मत !!

गोव्याला कांहीं स्फोट झाले. मुंबईच्या एका गोवन डॉक्टरपासून तो गोव्यांतल्या अनेक थरांतली माणसें पकडून नेली आहेत. पोर्तुगीजांनीं जातांना कांहीं 'आपली' माणसें पेरून ठेवलीं तशीच कांहीं 'अस्त्रें'हीं पेरून ठेवलीं होतीं, असें दिसतें. आतां हे स्फोट होऊं नयेत. स्वतंत्र गोव्याचे आतां सरकार झालें आहे. तिथें विधानसभा आहे. आतां तिच्यांत सरकार नियुक्त तीन प्रतिनिधी अजून नेमायचे आहेत. पण कितीतरी कारस्थानें बाकी असल्यानें त्या कामाला सवड मिळाली नाहीं. स्वतंत्र गोवा शोभायमान दिसेल असें पंडितजींना वाटायचें. गोव्याची कांहींतरी 'वेगळी' संस्कृति का काय म्हणतात ती आहे ना ! मग ती राखली गेलीच पाहिजे. हैद्राबादची आपली एक होती वेगळी संस्कृति ! पण ती त्या सरदारानें नाहीं राखूं दिली. वेगळी ! पण निदान गोव्याची तरी राखायलाच हवी ! पोर्तुगीज काय म्हणतील? जग काय म्हणेल? आतां एखादा स्फोट होतो. नाहीं असं नाहीं. पण तसें भिण्याचें कारण नाहीं. सारं कांहीं ठीक आहे. डरो मत !!

गोव्याची संस्कृति ठेवली वेगळी म्हणून स्फोट झाला आणि हैद्राबादची ठेवली नाहीं म्हणून स्फोट झाले—औरंगाबादला! गादी खालसा केली कीं, माणसें बदलतात. कालचा रझाकार म्हणे आज एकदम देशभक्त होतो. कालचा लीगर आज एकदम 'सारे जहाँसे अच्छा'' यह "हिन्दोस्ताँ" म्हणूं लागतो. असं मानायला माणसें तयार होतात. चोरटी दारू सांपडते. हातभट्टीची सांपडली तर ती निदान 'इनोसंट' तरी असते. फार तर ती पिणाऱ्याचें काळीज जाळील. पण ह्या चोरट्या दारूनें माणसें उडविलीं. कांहींचे तर तुकडे उडविले. घरें गेलीं. संसार उध्वस्त झाले. कटाचीं सूत्रें ठिकठिकाणांहून हलल्याच्या वार्ता येताहेत. स्वत: हंगामी मुख्यमंत्री जातीनें तिथें गेले आहेत. चौकशीचीं चक्रें फिरूं लागलीं आहेत. तसें भिण्याचें कांहीं कारण नाहीं. सारं कांहीं ठीक आहे. डरो मत !!

राष्ट्रकुल पंतप्रधान परिषद चालूं झाली. आपले पंतप्रधान प्रथमच परदेशीं जाणार होते. खंडप्राय देशाचे पंतप्रधान झाल्यानंतर त्यांना प्रथमच संधि मिळणार होती. पण पंडितजींच्या मृत्यूनंतरच्या (अकाली) कामाचा ताण एवढा पडला कीं, त्यांची प्रकृति बिघडली. आपल्याकडे कुठल्याही प्रश्नाचें गांभीर्य कमी करून दाखविण्यांत माणसें 'कुशल' असल्यानें शास्त्रीजींची प्रकृति नेमकी कशामुळें बिघडली हें आडवळणानें—कळेल न कळेल अशा बेतानें ह्या मंडळींना तें सांगावें लागलें. पण जाणकारांनीं त्या ओळींतला सूचक मजकूर जाणला आणि त्यांनीं चिंता व्यक्त केली. राष्ट्रकुल परिषदेला मग त्यांनीं प्रतिनिधी पाठविले. 'एकसे दो भले' या न्यायानें एक पुरुष व एक स्त्री यांची नियुक्ति झाली. 'समतोल' राखण्याची कल्पनाही त्यांत होती म्हणे. मग "टी. टी. के." नी 'आयुबखानां'ना स्नेहभेट—सदिच्छा भेट दिली. ज्यावेळीं लंडनमध्यें हस्तांदोलन व (खोट्या खोट्या) हंसण्याचा कार्यक्रम चालूं होता. त्याच वेळीं इकडे काश्मीर सीमेवरील पाकिस्तानी हातबंदुकीच्या फैरी झाडत होते. "हस्तांदोलन" विरुद्ध "हस्तपाटव" (गोळीबाराचें) केवढा विनोद ! आणि केवढी विसंगति ! पण राजकारण



अनुक्रमणिका

अभंच असतं. मोठी गंमत असते राजकारणांत! तसं भिण्याचं कांहीं कारण नाहीं. सारं कांहीं ठीक आहे. डरो मत!!

व्यापारी ही जातच मोठी मजेशीर आहे. तिला अधुनमधून झटके येत असतात. चीननें आक्रमण केलें तेव्हां ह्या जातीला एकदम एका रात्रीत 'देशभक्ती'चा साक्षात्कार झाला व नफेबाजी न करण्याची, भाववाढ न होऊं देण्याची तिनें प्रतिज्ञा घेतली. अधुनमधून असले झटके येणाऱ्या ह्या जातीच्या मंडळींना त्यांची मूळ प्रकृति मात्र स्वातंत्र्यानंतरही सोडत नाहीं. "संधी"वर स्वार होत नाहीं तो 'व्यापारी'च नव्हे. पंडितजींच्या मृत्युनंतर एकदम धान्य परिस्थिति बिकट झाली आणि भाववाढीचा राक्षस मोकाट सुटला. ह्या राक्षसानें सामान्य माणसाला भर बाजारांत अक्षरशः आडवा केला आहे. सरकारी फतवे व बाजारांतली वस्तुस्थिति यांत फार अंतर आहे. वृत्तपत्रांना, त्या फतव्यांनीं पानें भरण्याची सोय सापडत असली तरी त्यामुळें 'पोटें' भरण्याची सोय मात्र अजून उपलब्ध होत नाहीं. प्रत्यक्ष युद्ध चालू असतांनाही 'युद्धमान' न झालेली धान्य परिस्थिति नेमके काय करणार आहे—कितींचे बळी घेणार आहे कुणास ठाऊक? शेतकीप्रधान देशांत शेतकरी आणि सामान्य ग्राहक उपाशी राहतो आहे आणि एक वेगळीच जात पोसली जात आहे. मधुनमधून साखर, धान्यें परदेशीं 'चोरट्या' मार्गानें 'राजरोस' जातांना दिसतात. पण काळ्याबाजारवाल्यांना जशी फांशी कधीं झाली नाहीं (नेहरूंचे एक भंगलेलें स्वप्न) तशीच ह्या चोरट्या व्यापाऱ्यांनाही 'कडक' शासन झाल्याचें वृत्त अजून योग्य ते खिळे जुळत नसल्यानें वृत्तपत्रांत येणें बाकी आहे. बाकी सर्व ठीक आहे. भिण्याचें कारण नाही. डरो मत!!

डरो मत भाई! डरो मत!! राष्ट्र म्हटलें कीं कांहीं तरी समस्या आल्याच! आणि समस्याच नसत्या तर कर्तृत्वाला आवाहन कसें मिळणार? म्हणूनं तर कांहीं समस्या शिल्लक ठेवल्या आहेत, उत्पन्न केल्या आहेत. "वैऱ्याची रात्र आहे जागा रहा" असं तुम्ही आतां म्हणाल. पण हें कुणीं कुणाला सांगायचें? जनतेनें राज्यकर्त्यांना? कीं राज्यकर्त्यांनीं जनतेला? कां दोघांनीं एकमेकांना? वैरी आजचे नाहींत. इतिहासाचा तो वारसा आहे. पण आपण मात्र 'फितुरी'चा वारसा सोडला पाहिजे. नवा इतिहास घडवणारीं माणसें 'नवीं' असावी लागतात. "वैऱ्याची रात्र आहे तर आपण सारेचजण जागे राहूंया" हें खरें आजचें 'स्लोगन' आहे. असायला हवें. "डरो मत" हें खरें आहे. पण आमचा अर्थ मात्र वेगळा आहे. आपल्याला तो सांगायलाच हवा काय?

---

# दिव्यत्वाची येथ प्रचीति

**"एक** काळ ऐसा होता" असें रडगाणें गात भूतकाळांतच रममाण होणाऱ्या, त्याचे गोडवे गात गात वर्तमानाला बोटें मोडीत बसणाऱ्या व भयाण भविष्याची खोटीं काल्पनिक भविष्यें वर्तवीत वर्तवीत स्वतःला व भोंवतालच्या समाजालाही भेवडावणाऱ्या मंडळींची एक फार मोठी परंपरा आपल्या इथें नांदते. तिला समोर कधीं कांहीं चांगलें दिसत नाहीं. तिच्या डोळ्यांना असतो पिवळा चष्मा आणि प्रज्ञाचक्षूंना असते मागें दृष्टि! त्यामुळें 'तो एक काळ' अजूनही सरलेला नाहीं. तें दिव्यत्व इथें अजूनही फुलतें, बहरतें यावर तिचा विश्वासच बसू शकत नाहीं. परंतु तिचा विश्वास बसला नाहीं तरी तें दिव्यत्व प्रगटायचें कांहीं थांबत नाहीं. तें प्रगटतें. काळाच्या सुवर्णपानांवर आपलें नांव कोरून जाते आणि मग विद्यमान आणि येणारा काळ त्या सुवर्णपानांचें गौरवगीत गात राहतो.

अलिकडे अशा दोन वार्ता माझ्या वाचनांत आल्या. त्या केवळ वार्ता नव्हत्या. तर ती होती दिव्यत्वाची श्रेष्ठ प्रचीति! एक वार्ता **डॉ. जयंत नारळीकर** ह्या चोवीस-पंचवीस वर्षाच्या भारतीय व त्यांतही महाराष्ट्रीय तरुणाच्या अचाट बुद्धिमत्ते संबंधीची! तशी बुद्धिमत्ता थोडी इकडे तिकडे असतेच. पण संशोधनाची, नवनिर्मितीची जी प्रज्ञा असते तिला लोक प्रतिभावंत म्हणात. द्रष्टे म्हणतात. जगाचे मार्गदर्शक म्हणतात. तें मार्गदर्शक मग कलेच्या, शास्त्राच्या, तत्त्वज्ञानाच्या, साहित्याच्या, कुठल्याही क्षेत्रांतले असोत. कालचा शोध मागें टाकून जेव्हां नवा शोध लागतो तेव्हां कालचा संशोधक कांहीं कमी महत्त्वाचा ठरत नाहीं. त्याच्याच प्रवासाचा तो पुढला टप्पा असतो. डॉ. **नारळीकर** यांनीं गणिती सिद्धांत बसविला आहे. त्यांत त्यांना जें यश आलें तें केवळ त्यांचें आहे. त्यांच्या प्रतिभेचें आहे. त्यांच्या ह्या यशानें त्यांच्या कुटुंबाची मान तर उन्नत झाली आहेच. पण भारताची शान वाढली आहे. तेनसिंग एव्हरेस्टवर चढून गेला. तो दिवस जसा त्याच्या व भारताच्या इतिहासांतला एक श्रेष्ठ दिवस होता. तसाच डॉ. जयंत नारळीकर यांचें मूक संशोधन ज्यावेळीं सफल झालें तो दिवसही एक श्रेष्ठ दिवस गणला जाईल. चमत्कार करून दाखविणारी प्रज्ञा अजून कायम आहे ह्याची साक्षच जणूं नारळीकरांनीं दिली आहे.

दुसरी वार्ता आहे एका सामान्य रिक्षावाल्याची! माणसें गाडींत घ्यायची, त्यांचे सामान गाडींत भरायचें आणि त्यांना संकेत स्थळीं येऊन पोहचवायचें हें बिचाऱ्याचें काम! दिवसभरांत दहा-वीस नग पोंहचविले कीं, त्याच्या पोटाची सोय व्हायची! कधीं एखादं गिऱ्हाइक खूप (सहसा कमीच) झालं तर दोनचार आणे 'चा—पान्याला' मिळणार. असा रिक्षावाला बॅग विसरून गेलेल्या गिऱ्हाइकाला शोधण्यासाठीं स्वतःचा धंदा बुडवून जेव्हां चार तास भटकतो आणि गिऱ्हाइक शोधून काढून त्याची बॅग त्याला परत करतो. त्या बॅगेंत मोठें जडजवाहीर असते. गिऱ्हाइक खूप होणें अगदीं स्वाभाविकच! तसें तें होतेही. मग रिक्षावाल्याला मिळतात पांचशे रुपये बक्षीस म्हणून! आयुष्यांत कधींही न दिसलेली रक्कम हातीं आल्यावर त्यानें निदान रेसला तरी जावें कीं नाहीं. एखादा सट्टा तरी खेळावा कीं नाहीं. किमान पक्षी एखाद्या गुत्त्यांत जाऊन निदान हातभट्टीची तरी घ्यायची कीं नाहीं? पण त्या रिक्षावाल्याचें काळीज होतें हरिश्चंद्राच्या 'घराण्या'चें नांव सांगणारे! तो पैसा त्यानें घेतला आणि पंडितजींच्या स्मारक निधीला देऊन टाकला. हात राखून नव्हे! साराच्या सारा देऊन टाकला. आपली 'रिक्षावाली' ही भूमिका घेऊन तो निघून गेला. सामान्य रिक्षावाला 'श्रीमंत' ठरला. धीमन्त ठरला. जी गोष्ट करायला तथाकथित मोठीं माणसें एकदम धजलीं नसतीं तें त्यानें क्षणांत देऊन टाकलें. देऊन टाकून त्यानें खूप कमावलें. कधीं न संपेल असें! चिरंतनाशीं त्यानें नातें जोडलें. नरांतल्या 'नारायणा'ची साक्ष पटवून देऊन तो कामाला लागला. डॉ. नारळीकर व तो रिक्षावाला ह्या दोघांतल्या त्या दिव्यत्वाला अभिवादन असो.

**—सारस्वत**

अनुक्रमणिका

## Bon Vayage! डॉ. आजगांवकर

**डायबेटीक** अॅसोसिएशन ऑफ इंडिया या संस्थेचे मानद चिटणीस व मुंबईतले एक प्रख्यात मधुमेहतज्ञ डॉ. श्री. शां. आजगांवकर हे कॅनडांतील टोरेंटो या ठिकाणी भरणाऱ्या 'जागतिक डायबेटीक कॉंग्रेस'ला हजर राहण्यासाठीं ता. ६ जुलै रोजीं विमानमार्गे रवाना झाले. 'आंतरराष्ट्रीय डायबेटीक कॉंग्रेस'नें त्यांना खास आमंत्रण पाठवून, या विषयांत त्यांनी केलेल्या संशोधनाबद्दलही त्यांचा मोठा गौरव केला आहे—म्हणून दीपावलीतर्फे त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन! त्यांनीं केलेल्या संशोधनाधारें एक मधुमेह विषयक मौलिक प्रबंध त्या परिषदेंत ते वाचणार आहेत. अमेरिका, युरोप व जपान वगैरे देशांच्याही भेटी ते परततांना घेणार आहेत. तेथील मधुमेहविषयक कार्य पाहण्यांची त्यांची मनीषा आहे. "दीपावली"चा आणि डॉक्टरांचा संबंध त्यांना साहित्य-विषयक कार्यांत वाटणारा जिव्हाळा! दीपावली प्रसिद्ध झालेल्या पुष्कळशा वादविषयक लेखमालिकांबद्दल बऱ्याचवेळां त्यांनीं कांहीं बहुमोल सुचना केल्या आहेत त्यामुळेंच त्यांच्या परदेशगमनाबद्दल दीपावलीला सार्थ अभिमान. डॉक्टरांचा हा दौरा यशस्वी होवो असें इच्छितों—

—संपादक

(पान ५६ वरून)

करून जात नाहीं. खरं म्हणजे ह्या नाटकाचा विषय एका फार समर्थ अशा शोकांतिकेचा विषय आहे. 'फँटसी'चीं प्रकृतीच मुळीं ह्या विषयाची आहे असें वाटत नाहीं. तिची वेदना खोलवर त्यामुळेंच जाणवत नाहीं, व स्वप्नांना जी गति असते तीच गति ह्या ४५ मिनिटांच्या स्वप्ननाट्याला गृहित धरल्यानें तिच्या जीवनाची एक 'डॉक्युमेंटरी' झाली आहे. त्या प्रसंगांना जी एक भावनिक एकसंघता पाहिजे असते ती यांत जाणवत नाहीं. एका फार मोठ्या शोकांतिकेचा एक समर्थ विषय लेखकानें ह्या प्रयत्नांत "खर्ची" घातला आहे. तिच्या मृत्यूचा प्रसंगही सूचकतेनें अधिक परिणामकारक ठरला असता असें वाटतें.

प्रयोग मात्र चांगला होतो. विशेषतः स्नेहप्रभा प्रधान यांचें काम अतिशय अप्रतिम होते. त्यांना यांत वाव (तसा पुष्कळ असूनही) एकूण कमीच! कारण वेळ अपुरा व पात्रें पुष्कळ—करायचें व दाखवायचेंही पुष्कळ! परंतु अभिनयाचे बारकावे बाईंनीं शब्दांत, रडण्यांत, मुद्रेवरच्या भावांतून फार समर्थपणें व्यक्त केले. त्यानंतर क्रम आई (कमलिनी फडके) चा लागतो. कावलेली, पिडलेली आई त्यांनीं चांगली रंगविली. छोट्या मुक्तेनें (अलका सुळे) ही बरें काम केलें. बाकीच्यांबद्दल काय लिहूं?

एकूण 'अस्ताई'चा सूर सांपडला आहे असें म्हणतां आले असतें तर—मला खचितच आनंद झाला असता.

पण———

—अभिनव गुप्त

### दीपावली बुद्धिबळ ८ चें उत्तर

**आडवे शब्द—**

१ आश्रम, ३ कार्तिक, ६ पराक्रम, ८ रगत, १० मोहरबंद, ११ नमन, १२ ठीकठाक, १५ गरळ, १६ रपेट.

**उभे शब्द—**

१ आड, २ मनोरा, ४ कमरबंद, ५ रडतराऊत, ७ मगरमिठी, ९ देवाधीन होणें, १० मोहनभोग, १३ ठाकूर, १४ गट.

**विजयी स्पर्धक :—**

**(१) सौ. रोहिणी रामचंद्र रणदिवे, मुंबई.**
**(२) कुमारी सुशीला बाबूराव पाटील, ठाणें.**
**(३) मधुकर गणेश पाध्ये, नागपूर.**

वाचकांच्या निरुत्साही स्वागतामुळें यापुढें ही स्पर्धा बंद करण्यांत येत आहे.

## 'मौजे' प्रिं. ब्यूरोचे संस्था-संवर्धक श्री. पु. म. भागवत यांचें शोचनीय निधन

**येथील** मौज प्रिंटिंग ब्यूरोचे मालक श्री. पुरुषोत्तम महादेव भागवत यांचें वयाच्या ८० व्या वर्षी वार्धक्यामुळें ता. १७ जुलै रोजीं पहांटें निधन झालें.

गिरगांवांतील सुप्रसिद्ध 'मौज' प्रेस, मौज, प्रभात, व सत्यकथा या नियतकालिकांचे संस्थापक कै. पांडुरंग महादेव भागवत यांचे श्री. पुरुषोत्तमपंत ऊर्फ बाबा हे वडील बंधु. रत्नागिरी जिल्ह्यांत देवरूख गांवी ते दुकानदारी करीत होते. पुढें बंधूंच्या पश्चात् १९३८ सालीं वरील प्रेस व नियतकालिकें त्यांच्याकडे मालकीनें आलीं. सर्व चिरंजीव वयानें लहान होते. तथापि बाबांच्या देखरेखीखालीं त्यांचें शिक्षण होऊन त्यांनीं मुद्रणाचा व्यवसाय चांगला आत्मसात केला व प्रकाशनाचें कार्यहि पुष्कळच नांवारूपाला आणलें. त्यामुळें गेलीं २० वर्षे कै. बाबांचें आयुष्य सांसारिक निवृत्तींत व ईशसेवेंत गेलें असें म्हणावयास हरकत नाहीं

कै. बाबासाहेब भागवत यांची प्रवृत्ति प्रथमपासून राष्ट्रीय व धार्मिक असल्यामुळें व्यवसाय संभाळून त्यांनीं आपल्या तारुण्यांत लो. टिळकांच्या पैसा फंडासारख्या चळवळींत जातीनें लक्ष घातलें. तसेंच त्यांनीं देवरूखमधील न्यू इंग्लिश स्कूल, लोकमान्य वाचनालय, मुंबईची दक्षिणी ब्राह्मण सभा, म्हसकर सूतिका गृह, हा फ कि न इन्स्टिटयूट, वाई येथील प्राज्ञ पाठशाळा, कित्येक मंदिरांचे जीर्णोद्धार इ. सार्वजनिक कार्यासाठीं सढळ हातानें आर्थिक मदत करून शिवाय गरजू विद्यार्थ्यांना शैक्षणिक आणि कोणालाहि वैद्यकीय साहाय्य करण्यासाठो आपल्या मातोश्रींच्या स्मृत्यर्थ कायमचा उमा महादेव ट्रस्ट करून ठेवला आहे.

श्री. विष्णुपंत, जयरामपंत, वासुदेव यासारख्या त्यांच्या कर्तबगार मुलांनीं त्यांच्या हयातीतच त्यांची थोर परंपरा उज्ज्वल केलीच आहे यापुढेहि त्यांची स्मृति त्यांना स्फूर्ति देईलच. 'दीपावली'ची त्यांना मनोभावे श्रद्धांजलि !

